


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन








अनुक्रमणिका



# दीपावली

रसिक महाराष्ट्राचा साहित्य-कला-विलास

जानेवारी १९६९ • वर्ष २४ वे • मूल्य १॥ रु.

## श्रे य ना मा व ली

• **परशुरामाची सावली**....परशुरामाच्या पराक्रमी भूमीवरचे हे वादळ—**रवींद्र पिंगे** • **पुनर्जन्म**....वासंतीने बापूशीच विवाह करण्याचा निर्णय एकाएकी कां ठरवला ?—**वि. वा. पत्की** • **पळवाट**....बाळबोध घराण्यातली शहाणीसुर्ती मुलगी पळून जाते नि तिचे वडील खुशाल थंडच राहतात—**राजेंद्र बनहट्टी** • **रसिकहो परिसा परवडकथा**....'बटाट्याची चाळ' हाऊसफुल्ल झाल्याने कांद्याच्या चाळीचे हे दर्शन—**ह. शि. खरात** • **'आनंदी गोपाळ'** ही श्रेष्ठ कादंबरी म्हणता येईल का ?—**प्रा. म वा. धोंड** • याशिवाय गझल स्पर्धेतील उत्तेजनार्ह गझल * सन्मानपुष्पे * ऐसी अक्षरे * रंगमंच * दीपमाला.

## गेल्या महिन्यातल्या आणखी कॅराथॉन स्पर्धा

• मासिक बिंगचित्रमाला •

## कुटुंब नियोजन : विशेष पुरवणी

* कुटुंब नियोजनाची वाटचाल....कृ. वि. पेठे * पाळणा कसा लांबेल? * कुटुंब नियोजन कार्यक्रमाचे मूल्यमापन ....**सत्यनारायण सिन्हा** * लोकसंख्या नियंत्रण.

**दलाल आर्ट स्टुडिओ : ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिग प्रेस, २०१ खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किमत १॥ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही.  Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN·1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay–4.

अनुक्रमणिका




**दलाल आर्ट स्टुडिओ**
४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४
टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :
३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी** रु. १६

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.
● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१,खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.

# नव वर्षाची नवीन स्वप्ने.

"टाइम ॲण्ड टाइड वेटस् फॉर नो मॅन" असं म्हणतात. काळाच्या मडक्यातून क्षणाक्षणांनी स्वप्नांचं पाणी पाझरतच असतं आणि तरीही ते मडकं रिकामं होत नाही. जीवनाचे जिवंत झरे त्यातून पाझरतच राहतात. नवे क्षण — नवे दिवस — नवे तास — नवे मास — नवे जीवन आणि नवी स्वप्ने पाझरतच राहतात. जीवन नुसते येतच नाही. स्वप्नांची दुनिया पहात पहात ते अवतरत असते. स्वप्ने सरली की जीवन संपले. स्वप्नांची पखरण असते म्हणून ग्रीष्म जाळत नाही. हिमवर्षावातही धग मिळते. वर्षा वाहून नेत नाही जीवनाला आणि स्वप्नांनाही ! सारे सोबती थकतात. सोबत सोडून क्वचित निघूनही जातात. मार्ग वदलतात. साथ सरते. पण दोन गोष्टी माणसांना सोडीत नाहीत. त्यांची सावली आणि त्यांची स्वप्ने. म्हणून तर 'काल' ही 'आज' नसते आणि 'आज'ला उद्याची रमणीय स्वप्ने कोकिळेच्या गोड गळ्याने साद खालीतच राहतात. काळ झरतो. दिसा मासानी ते भांडे झरत राहते. आणि तरी जीवन सरत नाही. त्याला साथ सोबत देणारी सावली आणि स्वप्ने तशीच चिरनव राहतात. ती गातात उद्याचे गीत. देतात दिलासा सुखाचा, समृद्धीचा आणि शांतीचा ! मग ते आश्वासन सत्यात यावे म्हणून झुंजतात युगंधर. मात करतात मर्यादांवर आणि झेपावतात गरुडासारखी — अनंत आकाशात. करतात प्रवास महत्तमाच्या दिशेने. तिथे गवसलेली रत्ने देतात उधळून स्वप्नांचा ध्यास घेत जगणाऱ्या माणसांकडे. त्या रत्नांच्या होतात माळा आणि सृष्टी नटते. जीवन शोभून दिसते. त्या साधकांची नावे असतात कवि, कलाकार, गायक, नर्तक, तत्वज्ञ, संशोधक, वादक आणि चित्रकार–शिल्पकार आणि — अगणित नावे. कार्य एकच ! स्वप्ने पाहणे आणि त्या स्वप्नांच्या शिडकाव्याने ग्रीष्माचा दाह हिरावून घेणे. हिमाची शीतलता शोषून घेणे. सृष्टीला रुचिरतर, सह्य बनविणे. आजच्या तपातून 'उद्या'चे सुशीतल जीवन उभे करणे.

येणारे प्रत्येक वर्ष हेच करीत येते. पाने फडफडतात. उलटली जातात. पण ती पाने फडफडली तरी पृथ्वीवर भूकंप होत नाहीत. आकाशातले गरूड खाली कोसळत नाहीत. युगायुगातले 'कोलंबस' आपले 'गर्वगीत' गातच राहतात 'अनंत अमुची ध्येयासक्ति अनंत अन् आशा, किनारा तुला पामराला.'

ह्या अमर्यादाचा वेध घेतच 'दीपावली' आपल्या रौप्य महोत्सवी वर्षात पदार्पण करीत आहे. पंचवीस वर्षे ! अनेक स्वप्ने. एक ध्यास — अनेक अनुभव पण एक विश्वास. कडुगोड आठवणी, पण मनातला ध्रुव अचल. त्यामुळेच तर ही वाटचाल घडली. येणारे नवे संवत्सर फुलवीतच राहिले. 'दीपावली'तले दीप प्रकाशतच राहिले. म्हणतच राहिले, 'तम निशेचा सरला' पण तम सरला नाही. म्हणूनच नव्या प्रयत्नांची व संकल्पांची गरज आहे. 'दीपावली'ने रौप्य महोत्सवी वर्षाचे निमित्ताने अनेक संकल्प केले आहेत. जीवनाप्रमाणेच कलेच्या कक्षाही विस्तारत आहेत. ते घडलेच पाहिजे ह्याची जाण दीपावलीला आहे. 'कादंबरिका' हव्या आहेत. उत्तम कथा — एकांकिका, कविता — लेख हवे आहेत. रौप्यमहोत्सवी वर्षात महोत्सवाला साजेसे काहीतरी घडावे असे दीपावलीला वाटते. नवे वर्ष — नवे संकल्प घेऊन येत आहे. त्या संकल्पांची सिद्धी अखेर आपणा साऱ्यांच्या सहकार्यातूनच घडणार आहे. गतवर्षी 'कादंबरी स्पर्धा' झाली. सुंदर प्रतिसाद मिळाला. विश्वास वाढला. त्या विश्वासाचे पाथेय घेऊन तर रौप्यमहोत्सवी वर्षाची वाटचाल आम्ही करणार आहोत. तुमची साथ सोबत हवी आहे. स्वप्ने आमची असली तरी साथ तुमची हवी. संकल्प आमचे असले तरी सोबत तुमची हवी. कारण मासिकाच्या माध्यमातून साधायचा असतो अखेर एक संवाद ! तो 'सुसंवाद' ठरावा ही आमची मनोमन भावना !

'काल' विनाशी असते, पण काळ मात्र उदंड असतो. त्यावर स्वार व्हा म्हणज ख-पुष्पांच्या राज्यात विहरण्याचे भाग्य लाभेल.

—संपादक











## यश चौधरीचा गौरव कां नाही ?

स. न. वि. वि.

'दीपावली'च्या दिवाळी अंकातील 'प्रतीक्षा' कादंबरीचे पान न् पान वाचनीय तसेच उत्कंठापूर्ण आहे आणि सजविलेही आहे छान ! श्री. पेंढारकर यांनी टिपलेले अनुभव फार मोलाचे आहेत आणि त्या अनुभवांचा उपयोग सुंदर व सहजरीत्या करून घेतला आहे. त्यांचे हार्दिक अभिनंदन !

कादंबरी वाचताना एकच गोष्ट खटकली; शंका आली म्हणून विचारतो. यमुना ब्रिजवर गाडीची डिकी उघडेना तेंव्हा यश चौधरी पटकन गाडीत बसून ती पुलाच्या मध्यावरून पायथ्याशी नेतो. तेथे बॉंबस्फोट होऊन यशच्या प्राणांची आहुती पडते. देशासाठी आत्मबलिदान करणाऱ्या यश चौधरीला मरणोत्तर वीरचक्र वगैरे देऊन त्याचा गौरव झाल्याचे कां दर्शविले नाही ?

एक सूचना : श्री. पेंढारकर यांनी कोयना भूकंप पीडितांवर प्रत्यक्ष वर्णनात्मक कादंबरी लिहावी.

आपला,
कोल्हापूर **बबन बालिघाटे**

## यंदाची उत्कृष्ट भाऊबीज

स. न. वि. वि.

श्री. प्रभाकर पेंढारकर यांची 'प्रतीक्षा' कादंबरी वाचून मन आणि डोळे आनंदाने भरून आले. त्यांचे हार्दिक अभिनंदन ! आणि तुमचेही !

तुमची कादंबरी स्पर्धा जाहीर झाल्यापासूनच आपणास कोणती कादंबरी वाचावयास मिळणार याबद्दल फार उत्सुकता लागून राहिली होती. कारण हल्लीच्या कादंबऱ्या वाचणे म्हणजे निरुत्साह निर्माण करणे होय ! प्रेमाचा त्रिकोण असलेल्या कादंबऱ्या वाचण्याचा आता कंटाळा आला आहे.

'प्रतीक्षा' कादंबरी वाचली आणि खूप वेगळे वाचल्याची जाणीव झाली. एक तर विषय अगदी निराळा, त्यातच लहानपणापासून पॅराशूटबद्दल वाटणारे आश्चर्य, आणि युद्धाची रहस्यपूर्ण कथा ! 'फारच छान कादंबरी' याशिवाय आणखी शब्दच आठवत नाहीत. श्री. प्रभाकरभाऊनी आम्हा रसिक वाचक भगिनीना घातलेली ही भाऊबीजच आहे. यंदांची ही उत्कृष्ट भाऊबीज !

डी. एल. वैद्य रोड, आपली
दादर, मुंबई –२८ **विद्या जोशी**

## चार रागांची सुंदर रंगावली

स. न. वि. वि.

'दीपावली'चा दिवाळी अंक विकत घेऊन वाचला. चार रागांची रंगावली सुंदर आहे. 'प्रतीक्षा' कादंबरी उत्तम. त्याबद्दल श्री. पेंढारकर यांचे अभिनंदन ! इतर कथा व साहित्यही उत्तम वाटले.

सिव्हिल लाईन्स आपला
पुसद **अशोक गोखले**

## नजर खिळवून टाकणारी चित्रे

स. न. वि. वि.

दिवाळी अंक इतका उत्कृष्ट वाटला की लिहिल्याशिवाय राहवेना म्हणून लिहीत आहे. आपण काढलेली चित्रे उत्कृष्ट दर्जाची आहेत. मला चित्रातील बारकावे कळत नाहीत, पण चित्रावरून नजर काढू नये इतकी ती चित्रे नजर बांधून घेतात. श्री. पु. भा. भावे व प्रा. जी. ए. कुळकर्णी यांच्या गोष्टी आवडल्या. श्री. जयवंत दळवींची विनोदी कथाही चांगली आहे.

श्री. ग. त्र्यं. माडखोलकर व श्री. राजाराम हुमणे यांचे लेखही आवडले. गानपतस्विनी अंजनीबाई मालपेकर यांची माहिती वाचून चकित झालो. 'प्रतीक्षा' कादंबरी झकास आहे. वेगळ्या वातावरणातील ही कादंबरी सर्वानाच आवडेल असे वाटते.

४५, शनवार पेठ आपला
पुणे–२ **पंडित क्षीरसागर**

## हा 'हाल्डेन' कोणता ?

स. न. वि. वि.

'दीपावली'चा दिवाळी अंक नेहमीप्रमाणे सुंदर निघाला आहे. तुम्ही एक विशिष्ट वाचक डोळ्यांपुढे ठेवून अंक काढल्याचे जाणवते. हा वाचक सुशिक्षित, चौकस, चित्र, साहित्य संगीत, क्रिकेट इत्यादींची गाडी असणारा, पण त्यातला दर्दी किंवा विशेषज्ञ नव्हे, असा असावा. तुमचे 'जोगिया' हे चित्र, प्रभाकर पेंढारकर यांची कादंबरी, जी. ए. कुळकर्णी, अरविंद गोखले व जयवंत दळवी यांच्या कथा हे साहित्य विचक्षण वाचकालाही आकर्षित करणारे, खिळवून ठेवणारे आहे.

चित्रकार द. ग. गोडसे यांच्या कथेत असे एक वाक्य आहे की, "हाल्डेन नावाचा शास्त्रज्ञ गेल्या शतकात होऊन गेला." ( पृष्ठ ८६ ) हा हाल्डेन कोण ? आमच्या माहितीतला शास्त्रज्ञ व लेखक 'हाल्डेन' याच विसाव्या शतकात होऊन गेला. हा जे. बी. एस. हाल्डेन १८९२ मध्ये जन्मला व १९६५ मध्ये भारतात निधन पावला. त्याने भारताचे नागरिकत्वही स्वीकारले होते. श्री. गोडसे यांच्या माहितीत आणखी कोणी हाल्डेन आहे का ?

कुर्ला (पूर्व), आपला,
मुंबई–७० **प्रभाकर ना. परांजपे**

अनुक्रमणिका

**परशुरामाची पराक्रमी भूमी म्हणून मानल्या गेलेल्या या भूमीवरील भिन्नधर्मीय ग्रामसंस्थांचे आपापसातले संबंध प्रेमाचे, जिव्हाळ्याचे होते; पण एके दिवशी काहीतरी अफवा पसरली आणि सर्व वातावरण गढूळ झाले. त्यातून शेवटी कोणता मार्ग निघाला ?**

**श्री. रवींद्र पिंगे यांच्या कादंबरीचा हा पहिला भाग. नंतरचा दुसरा भाग ' दीपावली'च्या फेब्रुवारी अंकात प्रसिद्ध होईल.**

गडापर्यंत दर्याचं राज्य आहे. गडाच्या तटापासून राजापूराच्या अंगाला खाडीचा फाळ गेलेला आहे. दर्या म्हणजे एक बडं प्रस्थ आहे. लक्ष्मीधरासारखा तो बारा महिने तेरा काळ सालंकृत झुलत असतो. उलट, खाडीचा फाळ खानदानी तृप्त गृहिणीसारखा शांत, प्रसन्न आहे. खाडीच्या फाट्यातून तुम्ही केव्हाही ये-जा करा, तुमच्या डोळ्यांचो पारणीच फिटतील. खाडीच्या दोन्ही अंगानी हिरव्यागार बागांनी मोठी वहार उडवली आहे. खाडीतलं पाणी चोवीस तास चढत उतरत असतं. पहाटेस खाडीतून निघालात तर नारिंगी रंगाच्या डुबीने रंगलेल्या प्रसन्न दिशांची सोबत तुम्हाला लाभेल. दुपारी आकाश आणि खाडीचं पात्र, दोन्ही लखलखतात. संध्याकाळी खाडी संथवाहिनी होते. लहान बाळाच्या हसऱ्या गालांवर टोपरं टेकलेलं असावं, तशा निळ्या नभाच्या कडा दूरवरच्या हिरवट राखी डोंगरांवर टेकलेल्या असतात. रात्री काळोख कुंद असतो. पात्र कुठलं, काठ कुठले, मळे कुठले, आगरं कुठली, काही कळत नाही. फक्त आकाश तेवढं नीट उमगतं, जर चांदण्या चमचमत असतील तर. खाडीतून वर-खाली जाणं हा एक अद्‌भुत आनंद असतो. तुम्ही तो अगदी मनसोक्त लुटू शकता. निसर्गाने न्हीहा तानी धो-धो दान दिलेलं आहे. ते घ्यायचं, टाकायचं, सारं




**—रवींद्र पिंगे**

**' दीपावली 'ने रजतमहोत्सवी वर्षात पदार्पण करण्याच्या निमित्ताने लावलेल्या कादंबरी-स्पर्धेतील ही दुसऱ्या क्रमांकाची कादंबरी....**

तुमच्या पुण्याईवर अवलंबून. नव्या नवसाने मुंबईकर इकडे आले, की चढत्या उतरत्या पाण्याची ही मौज नुसती 'आ' वासून तासचे तास पहात राहातात. म्हणतात, " हजार–पाचशे मोजले तरी हे सुख तिकडे मिळणार नाही. तुम्ही कोकणवाले बॉ भारीच नशिबवान् !"

खाडीच्या काठावर चिवावे आहे. तुम्ही लखोटचावर लिहिलंत रा. रा. फलाणे–फलाणे, मुक्काम चिवावे, ता. देवगड, जिल्हा रत्नागिरी, तर फलाण्यांना पत्र पोहोचणारच नाही. कारण चिवावे हे गाव नाही. ती एक वाडी आहे. पंधरा वीस उंबरठे तिथे नांदताहेत. खाडी चिवाव्याला भेटते तिथपासून मळेजमीन सुरू होते. मळे ओलांडले म्हणजे चुन्याची सफेती मारलेलं चिवाईचं देऊळ लागतं. ही ग्रामदेवता. पहिल्या अक्षतेचा मान हिचा. चिवाव्याच्या पंचक्रोशीत कुठेही कसलेही कार्य निघो; कुलस्वामिनीला अक्षत नंतर जाईल – अगोदर हिला येईल, असला हिचा महिमा. गोपाळ सोनार शिकलेला, सुधारलेला. मुलाच्या लग्नाची अक्षत चिवाईला चुकवण्याची त्याला बुद्धी झाली. साऱ्या गावानं त्याला जागं केलं. पण त्यानं ढीम केलं नाही. हट्टाला पेटला. म्हणाला, "असली देवळं कोसागणिक असतात. त्यांचे मान कुठवर राखू ?" यजमानच असं बोलल्यावर दुसरं कोण काय बोलणार ? लग्न झालं आणि अंगाला लावलेली हळद उतरायच्या आत जेव्हा सून आटोपली तेव्हा तोच गोपाळ सोनार ठो–ठो करीत जागा झाला. चिवाईच्या हातापाया पडला. शिखराला तेली रंग चढवीन म्हणाला. पण चिवाईने नाही, म्हणजे नाहीच ऐकलं. तुम्ही नामा गुरवाला केव्हाही विचारा, तो छातीठोकपणे सांगेल, " देवीचो कोप लई झालो. गोपो सोनाराच्या झिलग्याचां लगीनच पुनः झालो नाय. सोनाराचो वंस खुंटलो. मी विचारतंय, देवीचो अपमान त्या खुळ्यान् अगुदर केलो कशाक् ?"

चिवाईचं देऊळ तळाला आहे. देवळाच्या पिछाडीला देवीचं आगर आहे. आगरातल्या उत्पन्नाची पै-पावली देवीकडे वळते. आगराच्या मागील अंगापासून जी घाटी सुरू होते ती चढत चढत थेट राजापुरच्या दस्तुरीपर्यंत जाऊन भिडते. घाटीचा एक एक जांभा चिरा हाऽऽ एवढा मोठा आहे. रामदासस्वामी ह्या बाजूला फिरकले नाहीत ते सोडा. एरव्ही चिवावकरानी ठोकून दिलं असतं, हे चिरे कल्याणस्वामीनी डोक्यावरून वाहून आणल्येत !" बाकी घाटी खरोखरीच इतकी आखीव नि भक्कम आहे की ज्यानी ती बांधून काढली त्यांची तारीफ करावी तेवढी थोडीच. पेशव्यांचा शेवटचा सरदार बापू गोखले ह्याच भागातला. साहजिकच घाटीचं बांधकाम



त्याच्याच नावावर मोडतं. 'बापूंची घाटी' हे कागदोपत्री नसलेलं तिचं नाव सर्वांना मंजूर आहे. असली कामं सेनापतींशिवाय होतील काय ? आणि जिथे घाटीची लांबीच मुळी चार कोस आहे, तिथे बृहस्पती झाला तरी तिच्या पायऱ्यांची मोजदाद तरी कोण करू शकणार ?

बापूंची घाटी मंतरलेली आहे हे दुसरे आश्चर्य ! खाडीच्या दोन्ही अंगांचे पिंपळ न् पिंपळ भारलेले आहेत. कुठल्या पिंपळाखाली सव्वाशीण पाच मिनिटं टेकीनसं म्हणेल तर फट् म्हणत्या ब्रम्हहत्या होईल. खरं म्हणजे कोकणातले सगळे पिंपळ ही जागृत मुंज्यांची वसतीस्थानं. भिमी भक्तिणीच्या परसवातल्या पिंपळाखाली सांजेला उभं राहून बाबीशेट तुळसकराने पैशाची मागणी केली नि ती पुरी झाली नाही म्हणून तिच्या आयशीबापसांचा उद्धार केला. भक्तिणीने सांगितलं, " बाबीशेटा, तुझो पै न् पै मी चुकती करतंय. पन एवढो वैशाख जांव दे. " बाबीशेट पडला भक्तिणीच्या पाचवीच्या घुगऱ्या खाल्लेला वाणी ! त्याने ताडताड शिव्या हसडल्या आणि तिथेच थुंकला. पण शेवटी हिशोब काय झाला ? दर अमावाश्येला बाबीशेट वेडंवाकडं वरळू लागला. शेवटी त्याच्या अंगावरून नारळ उतरवायला आणावी लागली भिमी भक्तीणच ! असले ते एक एक जागृत पिंपळ ! भक्तीण तुम्हाला सांगेल, " विसाची परीकशा घेतंस ? मग घे तर प्रत्येंतर नि भोग फळां आपल्या कर्मांची ! "

बापूंच्या घाटीच्या दोन्ही अंगाना वड-उंबर उभे आहेत. अधुनमधून पिंपळही आहेत. आश्चर्य आहे की घाटीवरलं एकही झाड भारलेलं नाही. घाटी तुम्ही केव्हाही चढा–उतरा, तुम्हाला कसलंही भय नाही. अवस असो, पुनव असो, एकादशी असो नाहीतर द्वादशी असो, ह्या घाटीवर कुणी झपाटलं असं झालंच नाही. घाटी रात्रंदिवस संचाराला मुक्त आहे. बाटुळकरमामा सांगतात, "अरे, काय त्रिशाद आहे काय कुठल्या पिशाच्च्याची ह्या घाटीवर वाटमारी करायची ? महाराज, ह्या घाटीवरनं सरकारचा खजिना जातो थेट राजापुरास ! इयलं पान न् पान साहेबाने मंतरून घेतलंय् ! " ह्यावर तुम्ही विचाराल, " केव्हा हो मंतरून घेतलं ? " आपल्या तुळतुळीत मस्तकावरून हात फिरवीत बाटुळकरमामा सांगतील, "त्यावेळी इकडे वस्ती मुळी होतीच कुणाची तर आपण आता हवाला द्यावा ? येवून-जावून ते भक्तीणीचं घर हीच काय ती जुन्यातली जुनी वास्तू. तिची साक्ष काढू म्हणाल तर तिला ओ म्हणता ठो येत नाही असला प्रकार ! साहेबाने मंतरून घाटी निर्धास्त केलीन. तेव्हा इथे वस्ती जमली."

बापूंच्या घाटीवरची माणसांची ये-जा अगदीच तुरळक असते. खुद्द चिंबाव्यात मीठमोहरीसकट सर्व किराणा हजर असल्यावर राजापुरास निघतो कोण आणि कशासाठी ? आणि राजापुरातल्या शेटलोकानी चिंबाव्यात उतरण्याचं तर काही कारणच नाही. विठू तलाठ्याला दर हप्त्याला राजापुराला जाऊन भाऊसाहेबाना सलाम हा घालावाच लागतो. तेव्हा सोमवार उजाडला की विठू तलाठी दशम्या बांधून राजापुराची दिशा पकडतो. पाऊस असो, उन्ह असो, तलाठीभाऊंची खेप घाटीवरनं राजापुराला दर सोमवारी झाली नाही असं होतच नाही. बाबीशेटचा नोकर निळू आठपंधरा दिवसाआड किराण्यासाठी घाटीवरून राजापुराला जातो. पण तो गेला केव्हा नि आला केव्हा कुणालाच कळत नाही. कारण पहिली चांदणी उगवली की तो घाटीची चढण धरतो नि प्रहरभर रात्र टळून गेली की पाठीवर पोतं घेऊन घाटी उतरतो. महंमदमास्तर तांबे खूप वेळा राजापुराला जातात, कारण शाळाखातं त्याना एक-








सारखी सर्क्युलरं पाठवतं आणि त्या इंग्रजी कागदाचा मराठी अर्थ लावून घेण्यासाठी त्याना सहा कोस तोडावेच लागतात. तुम्ही विचाराल तर ते सांगतील, " बाबा, न जाऊन करूंचां काय ? उद्या डेपुटीने फलाणा फलाणा सर्क्युलर दफ्तरातून कारा असां सांगितलांन तर सर्वानच्या पुड्यांत आणखी फार्स व्हायला नुको ! खरां कीं खोटां ?"

बर्वेकाका एकटेच असे आहेत की जे बापूंची घाटी रोजच्या रोज कोसभर चढतात नि उतरतात. त्याना सोबत-संगत कुणाचीच लागत नाही. त्यांचा कार्यक्रम ठरलेला असतो. सकाळचं पेजपाणी झालं की पडवीतल्या गणपतीच्या तसविरीला नमस्कार करून निघायचं. रस्त्यातल्या प्रत्येक धोंड्यावर छत्रीचं टोक आपटत आपटत साकवावर चढायचं. व्हाळ ओलांडायचा. चिंबाईचं दर्शन घ्यायचं. दोन मिनिटं टेकायचं. मग छत्री उघडायची नि घाटी पकडायची. हाशहुश्श करीत कोसभर अंतर काटायचं. ठरलेल्या पिंपळाखाली बसायचं. जाकीट-टोपी काढायची. दर्यावरून वहात आलेला वारा अंगाखांद्यावर खेळवायचा आणि दूरवर दिसणाऱ्या खाडीतल्या होड्यांची ये-जा चांगली घटकाभर बघायची; वाघोटण्याची झाडी दिसते काय ते पाहायचं. अंगावरचा घाम सुकला की मग परतीची दिशा धरायची नि वाटेत बाबीशेट तुळसकरांच्या दुकानात थांबून थेट घरी यायचं. हे असं वर्षोन्‌वर्षे चाललंय. बर्वेकाकांच्या सवयीही लोकांच्या लक्षात आल्याहेत. चिंबाईच्या देवळात पाचपंचवीस घंटा नवसाच्या आहेत. त्यातली एक ठराविकच घंटा काका वाजवतात. घाटीवर जिथे ते अंगावरचा घाम सुकवत बसतात, त्या जागेचा दुकानातले लोक "काकांचा कट्टा" असाच उल्लेख करतात. बाबीशेटच्या दुकानात मंडळीला इतकं उधाण येतं. पण काका त्या ठराविक लोखंडी खुर्चीवर बसणार. त्या खुर्चीवर आधीच कुणी बसला असला, तर ते निमुटपणी तिष्ठत उभे राहातील, पण दुसऱ्या रिकाम्या खुर्चीवर टेकणार नाहीत. मख्ख नसेल तर बसलेला खजिल होतो. काका मग त्या खुर्चीवर अधिकाराने बसतात. लोक चेष्टेत म्हणतात, "आणखी शंभर वर्षे थांबा नि ह्या बापूच्या घाटीला लोक 'काकाची घाटी' म्हणतात की नाही ते सांगा !"

काकांच्या कट्ट्यावर तुम्ही बर्वेकाकाना गाठा. ते तुम्हाला शंभर गोष्टी ऐकवतील. तसा आठवणीला माणूस पक्का. इतिहासाचं पान न् पान जिभेवर आहे. राजापुरातल्या ईस्ट इंडिया कंपनीच्या वखारीची वीट न् वीट त्याना माहीत आहे. डोळ्यात आसवं आणून सांगतील, " ब्रिटीशाला सुद्धा भुलवलन् असला नामी जिल्हा हा. पण आमचीच औलाद डरपोक. सातसागर पेंवत पेंवत साहेब राजापुरचं बंदर शोधीत आला नि आमचे पोरगे राजापूर सोडून मुंबैस गेले ! असले हे फालतू लोक ह्या भूमीचं भाग्य घडवणार ते काय, नि ह्याना बरकत लाभणार ती काय ? बघा, ते वाघोटणं बघा. ती सुपारी बघा. त्या नारळी बघा. अरे, सोनं आहे ते सोनं ! पण कुणाला ? जो खपेल, घाम गाळेल, त्याला. आमची पोरं घाम गाळतील. रक्त आटवतील. पण कुठे ? मुंबैच्या गिरणीत ! जन्मच्या जन्म खानावळचे राहातील. फुटपाथीवर झोपतील. विचारून बघा हवं तर. कोकण नको म्हणतील. उतारखर्चाची सबब सांगतील. पण लेकानो, विडीकाडीचा खर्च करता त्याच्या निम्म्याने इकडे केलात नं, तरी इकडे सोनं पिकवाल रे, सोनं पिकवाल !" मग दीर्घ श्वास सोडून शांतपणे सांगतील, "आम्ही खूप म्हणू म्हणा की बाबानो ह्या नंदनवनात या रे; पण त्यांच्या कपाळी जिथे सुख-सावली नाही तिथे प्रत्यक्ष ब्रम्हदेव झाला तरी तो काय रडणार कप्पाळ ! करंटेपणा संपवू म्हणून संपत नाही रे बाबा, तो यदृच्छेनेच संपावा लागतो."

बर्वेकाकांचं हे भाषण सुलेमान दालदीला तोंडपाठ झालंय. सुलेमानचं म्हणणं आहे की ह्या काकाला जर कोकणाचा एवढा पुळका आहे तर हा बहाद्दर चांगली मुंबईतली सोन्यासारखी नोकरी सोडून देवून ह्या घाटीचे चिरे मोजायला इथे मुळी आलाच कां ? खरं तर काकाने तिकडे माया जमवायची नि फंड घेऊन त्याच रकमेत इकडे एक दुकान ठोकायचं—गेला बाजार दोन कुळवाड्यांचं पोट तरी भरलं असतं. नि शिवाय काकाच्या हातात सल्लेजोड चमचमले असते ते वेगळेच. तो राजमार्ग दिलान् सोडून. आणि आता हा ब्यॅलीस्टर आमचे तरुणलोक कोकणात राहून नशीब काढत नाही म्हणून बोटं मोडत बसलाय ! स्वतः डरपोक नंबर एकचा नि मारे जगाला चूड दाखवत सुटलाय. बायको उगाच नाही त्याला जोडे मारीत !

सुलेमानचं म्हणणं जमेस धरून सुद्धा बर्वेकाकांचं मत ठाम आहे: परशुरामाच्या ह्या पराक्रमी भूमीला आज वाली म्हणून कोण तो उरलेला नाही !

तरुणांच्या मदतीची आशा नाही; पन्नाशी ओलांडलेली; ज्याच्यासाठी उरी फुटावं अशी एक बायको सोडल्यास दुसरं मागे कुणी नाही आणि चेष्टेला सारे एका पायावर तयार, एवढा जालीम मसाला असतानासुद्धा काकावर्वे चिंवाव्यात कायमच्या वस्तीला आले. मनात हेतू एकच होता : परशुरामाच्या ह्या भूमीला नकाशावर मानाचं स्थान मिळावं ! परशुरामाच्या ह्या चौथऱ्यावर दिवा लागावा !

* *

गेल्या महिन्यात गाजलेल्या आणखी 'कॅराथॅान' स्पर्धा . . .




**ताडीसाठी भाऊ गर्दी. पण ताडी कोठे आहे ? एक बातमी.**






# [ २ ]

डाव संपला. तुळसकरांची पडवी शांत झाली. गंजिफांचे जोड वाटुळकरमामानी पिशवीत टाकले. मेढीला अडकवून ठेवलेला कंदील वर्वेकाकांनी लावला आणि ते अंगणात आले. अंगणात चांदण्यांचा फिका उजेड पडला होता. तेवढ्या प्रकाशात चालायला सुधारलं असतं. शिवाय वाट पायाखालचीच होती. म्हणून लावलेला कंदील काकानी मालवला. चांदण्यांचा अदमास घ्यायसाठी त्यानी वर पाहीलं. वर चंद्राला प्रदीर्घ खळं पडलं होतं. सर्वाना ते दाखवीत काका म्हणाले,

" मंडळी, वर काय खेळ चाललाय पहा तरी ! "

चंद्राला पडलेलं खवल्या खवल्यांचं प्रदीर्घ खळं सर्वानी पाहीलं. बावीशेट म्हणाले,

"तरी मी म्हणतोय डाव हातचा असताना सर्व सोडून इस्पिकची उतरी करायची दुर्बुद्धी मला कशानं झाली ? आत्ता सगळा उलगडा झाला !"

" घ्या ! " काका उद्गारले, " कुठे चंद्र, कुठे खळं, नि कुठे ह्या तुळसकरांच्या पडवीवरला विजिकचा डाव ! बावीशेटनी आपला संबंध थेट चंद्र–सूर्यापर्यंत भिडवला !"

" कां नाही भिडवणार ? डर हाय कुणाची ?"

" स्वतःच्या मनाची तरी हवी रे महाराजा ! खळं फक्त राजेलोकाना बाधतं. "

" म्हणूनच मला बाधलं. बावीशेट राजा आहे ह्या चिवाव्याचा. आता काय म्हणणं आहे ?"

" प्रजाजनांचं म्हणणं काय असायचंय ? उद्या महाराजानी बिजिकला कडक कॉफी द्यावी ! काय मंडळी ? मंजूर ?"

" मग अगोदर कां नाही मागितलीत काका ? आत्ता ठेवायला सांगू ? थांबा तर."

" इतकं म्हटलंत ह्यात सारं उद्या केव्हा जमायचं ते आलं. बोला."

" नेहमीसारखं."

" पण उद्या आहे गुरुवार."

" मग दत्ताचं भजन संपल्यावर बसा."

" ठरलं."

" सर्वांनी यायचं बरं का !"

दुसऱ्या दिवशी पदरात पडणाऱ्या बावीशेटकडच्या कॉफीची चव जिभेवर घोळवत काकांनी फाटक उघडलं. इतक्यात उजव्या अंगाच्या पायवाटेने एक चूड लफलफत येताना त्याना दिसली. काळोखात पेटलेला तो आक्राळविक्राळ प्रकाश पहात ते जागच्या जागीच खिळले.

" ही काय नवीन भुताटकी ?" वाटुळकरमामानी चमकून विचारले. तोपर्यंत काळोख कापीत चूड जवळ आली. ती घेऊन येणारी आकृती पाहून महंमदमास्तर म्हणाले,

" अरे, ताई देवधरनीचो भिको हा ! काय रे भिको ? इतकी रात करून्सा आयलास ?"

धापा टाकत टाकत भिकू बावीशेटच्या फाटकाजवळ लोहाराच्या भात्यासारखा फाप् फाप् करीत उभा राहिला. तो भेदरलेला आहे हे त्याच्या चेहेऱ्यावरून स्पष्ट दिसत होतं.

" इतक्या उत्तर रात्री असा इकडे कुठे रे ?" काकानी विचारलं.

" ताईनं बोलंवलंय सगळ्याना." भिकूने सांगितलं.

" पण प्रकार काय आहे ?"

" आमची गाय कापलिनी !"

" कुठली रे भिको ? ती ढवळी सावित्री होय रे ?"

" नाय्. ती काळी होती ना वेणू म्हणून ? तीच."

" अरे, काय म्हणतोस काय भिको ?" काकानी न रहावून विचारलं, "ती काळी वेणू कापलिनी ? नि केव्हा ?"

" ते आपला तायला विचारा तुम्हीच."

" अशी गाय कशी कोण कापेल ?" महंमदमास्तरानी शंका काढली.

" तुम्ही लोक ते सुद्धा कराल !" बावीशेटने ठासून सांगितलं.

महंमदमास्तरांचं समाधान झालं नाही. ह्या बातमीवर त्यांचा विश्वासच बसला नाही. ते नुसतं ऐकत राहिले.

"काका, चला, अगोदर आपण ताईकडे जाऊ या नि काय प्रकार आहे ते स्वतःच्या डोळ्यांनी पाहू या."

बावीशेटचं म्हणणं काकाना पटलं. घराकडची पावलं त्यानी नारायण पाखाडीतल्या ताई देवधरणीच्या घराकडे वळवली. वाटुळकरमामा गंजिफ्याची पिशवी सावरीत काकांबरोबर निघाले. पाच मिनिटं चालून गेल्यावर बावीशेटनं आजूबाजूला पाहिलं. त्याना महंमदमास्तर तांबे दिसेनात. त्यानी विचारलं,

" आता तो महंमदमास्तर कुठे पळाला ?"

गेल्या महिन्यांत गाजलेल्या आणखी " कॅरायॉन " स्पर्धा......




आम्हाला लाल राज्य हवे आहे.



अनुक्रमणिका

"आपण दत्ताच्या वाकणावर वळल्यावर मास्तर उलटचा फाटचातून मोहल्ल्यात निघून गेला."

"पण जाताना सांगायचं की नाहीं ?"

"सांगायला त्याला तोंड आहे का ? गाय कुणी कापलिनी असेल ते त्यानं नेमकं ओळखलंय."

"खरं; पण प्रकरण काय आहे ते बघायला तरी यायचं चार पावलं."

"मरू दे तो-महंमदमास्तर. तुम्ही पाय उचला झपझप."

भिकूने पेटवलेल्या चुडाच्या लोंबत्या प्रकाशात सगळेजण नारायण पाखाडीकडे निघाले. चांदण्यात नीट दिसलं असतं. पण झाडी एवढी गर्द होती की चांदणं तिच्यातून खालपर्यंत गळत नव्हतं. वाटेच्या दोन्ही अंगाला निवडुंगाची वई होती. तिच्या काटेरी पेरांवर चुडाचा थरथरता प्रकाश पडला की चहूबाजूनी सर्पांनी वेढा घातल्यासारखं दिसायचं. चुडाने काळोख उजळत भिकू सांगत होता,

"कालच्या सांजेपासून वेणू घराकडेच परतली नाय."

"मग तुम्ही काय करत होता ?"

"आम्ही म्हटलां रस्ता चुकली असेल; येईल सकाळ करून."

"त्यांवर दुपार गेली. संध्याकाळ गेली. रात्र गेली आणि आता कोंबडा आरवायला आला तेव्हा जागे झालात काय रे सोद्यानो !"

"आमची आशा होती."

"पण मी म्हणतो गाय सांडल्याय हे लपवून कां ठेवलंत इतका वेळ ? सकाळपासून दोन फेऱ्या झाल्या तुझ्या दुकानावर. पण ब्र काढला नाहीस ह्या बाबतीत."

"हो. आणि एरव्ही कोणाच्या पोटात जरी दुखत असलं साधं तरी गावभर बोंब मारीत फिरतील हे !"

"गाय कापलिनी, कापलिनी म्हणता ते रे कशावरून ?"

"काका, त्या महंमदमास्तरलाच शोभतील असल्या शंका काढून तुमची जीभ विटाळू नका बुवा."

"घ्या ! म्हणजे आम्ही साधा पुरावासुद्धा विचारायचा नाही !"

"आता मोहल्लेवाल्यांवर शेकायला आलंय तेव्हा तुम्हाला पुरावे सुचतीलच. आमचं हिंदूंचं मरण हे इथे आहे बघा !"



काकांचं बोलणंच खुंटलं.

सगळी फौज नारायण पाखाडीत आली. चांदण्याच्या शिडकाव्यात धाव्याची घरं आणि चिऱ्यांचे गडगे स्वच्छ धुतल्यासारखे दिसत होते. देवधरांचं बाळबोध कौलारू घर आंघोळीनंतर झोपी गेलेल्या बाळाच्या चेहेऱ्यासारखं शांत दिसत होतं. घराच्या पाठीमागे काळ्या निश्चल झाडीची फणा होती. सारवलेल्या स्वच्छ अंगणाच्या कडेला पांढऱ्या चाफ्याची झाडं समयांसारखी शोभत होती. त्याच्यावरचे फुलांचे कळे ज्योतींसारखे दिसत होते.

सर्व शांत होतं. घरात फक्त ताई रडत होत्या.

काकांच्या काळजात चर्रर झालं.

भिकू पुढे झाला. त्याच्या मागोमाग मंडळी घरात शिरली. माजघरात देवासमोर निरांजन तेवत होतं. त्या स्निग्ध फिटुरक्या प्रकाशात ताईंचे रडून रडून सुकलेले डोळे एका क्षणात सगळं रामायण सांगून गेले. ताईंच्या शेजारी झोप पळालेली भिमी भक्तीण बसलेली होती. मंडळी पाहिल्यावर आपला ओसाड पदर न सावरता ती म्हणाली,

"काकांनू, आता तुमीच न्याय देवा !"

आवाज आडाच्या पाण्यासारखा गार करीत काका म्हणाले,

"ताई, प्रकरण काय आहे ? नि इतका वेळ माणूस कसा नाही पाठवलास तू ? की आम्ही म्हणजे तुझे कोणीच नव्हत ?"

"आशा होती रे बाबा, आशा होती हो ! कालच्या तिन्ही सांजेपासून माझी बाय घरां नाय आली."

"ताय, पण तू तेव्हापासूनच धावाधाव नाही का करायचीस ? आम्ही दुकानदार काय मेलोवतो ?" बाबीशेट म्हणाले.

"आता धावाधाव केली, की न केली ते एक मज ठाऊक का देवास ठाऊक ! पाण्याचा थेंब घेतलाय नाय मी तेव्हापासून. साक्षीला देव आहे."

"प्रश्न तो नाही; आता सोन्यासारखी गाय गेली की नाही जिवानिशी ?"

"कित्ती गुणाची हो माझी गायत्री काका !" रडत कण्हत ताई सांगू लागल्या, "दिवेलागणी झाल्या नि वेणू गोठ्यात नाय असं कधी झालंच नाय बघा. मी सांजेची देवाचं म्हणायची, तर माझी बाय डोकावून डोकावून बघायची हो घरात. अस्सं तिचं देवाकडे लक्ष ! नि काल कस्सा तिचा पाय चुकला, काय कळत नाय. दृष्टच लागली हो माझ्या बायला, दृष्टच लागली."

"पण मी म्हणतो, वाघानं कशावरून नेली नसेल ?" काकांनी विचारलं.

"घ्या ! म्हणजे हे गोब्राम्हण प्रतिपालक आता आम्हालाच शाणपण शिकतायत !" बाबीशेटानी दाखला काढला, "अरे, समजा वाघुट आलं, तर ते काय एकच गुरू नेल ?– नि तेही नेमकं ह्या तायच ? अरे, आपल्याच्याने काय होत नाही तर निदान दुसऱ्याचा बुद्धिभेद तरी करू नका !"

(पृष्ठ ४४ वर पहा)







# तो आमचा एकमेव आश्रयदाता आहे.





निदान विजयला तरी तसे वाटते.
अन् त्यात काही वावगे आहे असे आम्हांला वाटत नाही. विजयचा आमच्या बँकेत करंट अकाऊंट आहे; त्यातून आम्ही त्याची रोजची बिले भरीत असतो. शिवाय आमच्याकडे त्याचे सेव्हिंग्ज खातेही असल्यामुळे त्याचे बचतीचे कामही अतिशय सोपे होते. रिकरिंग आणि फिक्सड् डिपॉझिटसद्वारा त्याने जमविलेल्या पैशात कशी वाढ करता येईल याबद्दल आम्ही त्याला सल्ला देतो. ...गिन्यासारख्या बहुमोल ऐवजाची काळजी ...म्ही सेफ डिपॉझिट लॉकरही उघडला आहे. अन् विजय जेव्हा प्रवासात असतो तेव्हा त्याला प्रवासी चेक्स् देऊन त्याचे तेही काम आम्ही सुकर आणि सुरक्षित करीत असतो. तुम्ही म्हणाल, अशा तऱ्हेने त्याचे लाड करून आम्ही त्याला बिघडवीत आहोत. खरे आहे. एका चांगल्या अर्थाने ते निश्चितच खरे आहे।
आपण या बँकेचे एकमेव आश्रयदाते आहोत असे विजयला का वाटावे, हे तुमच्या आता सहज ध्यानी येईल.. आमच्या लक्षावधी आश्रयदात्यांना अगदी विजयसारखेच वाटत असते ! (ही भावना किती सुखद आहे याचा प्रत्यय प्रत्येकाने घेण्यासारखा असाच आहे.)




तुमच्या चिरंतन समृद्धीची गंगोत्री म्हणजे

**दि बँक ऑफ बरोडा लिमिटेड**

(स्थापना : १९०८) रजिस्टर्ड ऑफिस : मांडवी, बडोदे
भारतात व परदेशात मिळून ३०० पेक्षा जास्त शाखा

हीरक महोत्सव १९०८–१९६८

Shilpi BOB 10A/68 Mar









अनुक्रमणिका



# पुनर्जन्म

**—वि. पा. पत्की**

सोलापूरहून परत आल्यापासूनच रेणुकाचं मन उद्विग्न झालं होतं. जे झालं ते काही चांगलं झालं नाही या विचाराचे दंश तिच्या मनाला हजारदा झाले होते. आपल्या अविचारानं आक्कानं एका उमद्या जीवाची राखरांगोळी केली होती या विचारानं तिचं मन बेचैन झालं होतं. हे सारं झालं तरी कसं हे कोडं तिच्या मनाला काही केल्या उलगडत नव्हतं, पण तिचं मन मात्र सारखं म्हणत होतं, "हे काही चांगलं झालं नाही ! आक्कानं आपला मार्ग शोधून काढला खरा, पण शरदला मात्र देशोधडीला लावलं, त्याच्या जीवाची राखरांगोळी केली!"

पण कधीकधी हा विचारही तिच्या मनात स्थिरावत नव्हता. तिला वाटत होतं, किती झालं तरी आक्का माझी मोठी बहीण, तिला दोष तरी कसा द्यायचा? हा विचार मनात आला की तिचं मन गहिवरून जायचं, तिचा कंठ सद्‌गदित व्हायचा. सोलापूरहून आक्काच्या लग्नाहून परत आल्यापासून आज आठवडाभर ती सारखी म्हणत होती, 'शरदवर तुझं केवढं आभाळाएवढं प्रेम होतं! त्याच्यासाठी तू जीव टाकायचीस्, त्याच्याबद्दल कोणी वाईट शब्द काढला की चवताळून उठायचीस! मग त्याच शरदला सोडून तू एकदम बापूबरोवर लग्न करायचं कबूल केलंस तरी कसं? बापूचा कळवळा तूला आताच आला तरी कसा? म्हणे 'माझ्याबरोबर लग्न करायचं नाकारलंस तर मी जीव देईन' अशी धमकी त्यानं दिली म्हणून शरदचं नाव टाकण्यावाचून मला गत्यंतरच उरलं नाही! आक्का, आक्का, खरंच सांगते आहेस का ग तू हे?' बापू तुझा तसा माझाही आतेभाऊच, तू त्याच्या बद्दल काय काय बोलायचीस ते मला काय माहीत नाही? नेभळट, ढेरपोट्या, ऐतखाऊ – काय काय विशेषणे तू त्याला लावायचीस. तोच बापू तुला एकदम कसा काय आवडू लागला ते एका परमेश्वरालाच माहीत!"

सोलापूरहून आल्यापासून रेणुकाच्या मनात हा विचार सारखा येत होता, तिला अस्वस्थ करीत होता. कारण घडलं होतं ते सारंच विपरीत घडलं होतं. कोणाचाही विश्वास बसू नये असं, सत्य हे कल्पिताहून अधिक विस्मयजनक असतं हे कोणालाही पटावं असं.

आक्का बापूबरोबर लग्न करील हे रेणुकाला दोन महिन्यापूर्वी कुणी सांगितलं असतं तर ती म्हणाली असती, 'आक्का? आणि बापूबरोबर लग्न करणार? काय वेडबिड तर लागलं नाही तुम्हाला? अहो, बापू तिला दृष्टीसमोरसुद्धा नको असतो. माणसानं गरीब असावं, पण ऐतखाऊ असू नये असं ती आत्याला म्हणाली ते बापूला उद्देशूनच होतं, हे तुम्हाला नसलं तरी मला माहीत आहे. पडवली गावातली घरची एवढी शेती-वाडी, दोन चांगली भाडी येणारी सोलापुरातली घरं, घरात चांगले नोकर–चाकर

आहेत, आणि त्यात एकुलता एक मुलगा, पण आक्काच्या लेखी त्याची किंमत शून्य आहे. असल्या या उसन्या वैभवाचा मयंकर तिटाकारा आहे तिला! "आत्यानंच आम्हा दोघा बहिणींना लहानाचं मोठं केलं, आमचे करता येतील तेवढे लाड केले, आमच्या दुखऱ्या मनावर सहानुभूतीची फुंकर घातली, पण आक्काला सून करून घ्यायची भाषा ती अधूनमधून काढू लागली तशी आक्का काय म्हणाली ठाऊक आहे तुम्हाला? 'असल्या नेभळटाबरोबर लग्न करण्यापेक्षा आज गाडीखाली जीव देईन मी!'

पण त्याच आक्कानं आता बापूबरोबर लग्न केलं होतं. लग्न झाल्याबरोबर दुसऱ्याच दिवशी बंगलोरला 'हनी-मून'साठी ती गेली सुद्धा होती. हे सारं घडलं तरी कसं याचा अचंबा रेणुकाला रात्रंदिवस वाटत होता, पण तिच्या मनात एकच विचार अंधेऱ्या खोलीत घिरट्या घालणाऱ्या वटवाघुळासारखा घिरट्या घालीत होता, 'शरदवरचं आपलं प्रेम ती अशी सुखासुखी विसरली तरी कशी? माणसाला केलेलं प्रेम असं विसरता येतं? त्याच्या यातना होत नाहीत. त्याचं शल्य मनात ठसठुसत रहात नाही? आणि हे सारं तिनं केलं ते कुणासाठी? तर अगदी लहानपणापासूनच ज्याच्याविषयी तिच्या मनात तिरस्कार होता त्या बापूसाठी? लहानपणी आम्ही खेळत असलो आणि आमच्या खेळात तो आला तर ती म्हणायची, 'बायकात पुरुष लांबोडा!' खेळातसुद्धा ज्याचा सहवास जिला नको वाटे, त्याच आक्कानं साऱ्या जीवनाचा खेळ त्याच्या बरोबर खेळायचं ठरवलं हे झालं तरी कसं ?

तिला सारं आठवत होतं..

गेल्या वर्षभर फर्ग्युसन कॉलेजच्या मुलींच्या वसतिगृहात त्या राहात होत्या. रेणुका त्याच वर्षी आली होती, पण तिची आक्का तिच्या आधी दोन वर्षं तिथं होती त्यामुळं साहजिकच त्या वातावरणाला ती चांगली सरावली होती, तिच्या ओळखी-देखी अधिक झाल्या होत्या. रेणुका तिथं आली तसं दोघा बहिणीतलं प्रेम पाहून तिथं राहणाऱ्या साऱ्याच मुलींना मोठं कौतुक वाटलं होतं, पण वासंतीची धाकटी बहीण', हे रेणुकाचं वर्णन हळूहळू मग लोपू लागलं आणि 'रेणुका मोठी हुशार आहे,' 'रेणुकावर तिच्या आक्काचं मोठं मुलखावेगळं प्रेम आहे.' 'रेणुका तू शंभरातले शंभर मार्क का मिळविलेस गणितात?' अशी कौतुकमिश्र भाषा सर्वत्र ऐकू येऊ लागली होती. वासंती धोपट-मार्गी तर रेणुका महत्त्वांकाक्षी, वासंती अबोल तर रेणुका अखंड बडबडणारी, यामुळं साहजिकच रेणुकानं साऱ्यांचं लक्ष चटकन वेधून घेतलं होतं.

वासंती एकटी पुण्यात होती तेव्हा दरसाल कॉलेजला सुटी झाली की सोलापूरला यायची ती उल्हसित मनानं, कसलं तरी मधुर स्वप्न मनात उमलल्यासारखी. रेणुकाचे लाड करायचं तर तिचं लहानपणापासूनचं वेड होतं. आत्यानं दोन बाहुल्या आणल्या तरी त्यातली रेणुकाला जी हवी असेल ती तिला घेऊ द्यायची, तिच्याबरोबर कधी भांडायची नाही, हे तिचं ठरलेलं वागणं. आत्यानं एकदा खणांचे परकर पोलके शिवण्यासाठी दोन खण आणले, त्यातला किरमिजी रंगाचा खण वासंतीला फार आवडला होता, पण 'मला हाच हवा'

**....'जीवनाचा अर्थ त्यागानं कळतो, भोगानं नव्हे, हे ज्याक्षणी उमजलं त्यावेळीच आपला पुनर्जन्म झालासं वाटलं नि नव्या जीवनाची नवी वाट दिसली..' हे रेणुकेचे विचार वाचून ती पुटपुटली.... आक्का कुणी शिकवलं ग हे सारं शहाणपण तुला ?.... कुणी शिकवलं ?**

असा हट्ट रेणुकानं धरला तेव्हा वासंती म्हणाली होती, 'आत्या, रेणुकाला शिव त्याचा परकर पोलका.' वासंतीच्या बोलण्याचालण्या-तला हा समंजसपणा पाहिला की आत्याचं मनही गहिवरायचं आणि ती म्हणायची, 'आई-बापावेगळी ही मुलं. आईबाप लहानपणीच गेले की मुलांच्या अंगी फार लवकर समंजसपणा येतो की काय कुणास ठाऊक?' वासंतीचा समंजसपणा पाहिला की आत्याला तिच्याबद्दल एक निराळीच आपुलकी वाटायला लागायची. ती तिला जवळ घ्यायची, तिचे पटापट मुके घ्यायची आणि तिला कुरवाळायची. रेणुकाला मग तिचा उगीचच हेवासुद्धा वाटायचा आणि तिचं मन हिरमुसलं व्हायचं, पण दोघीही वयानं वाढत गेल्या आणि आपल्या आक्काचं आपल्याविषयीचं निर्व्याज प्रेम रेणुकेच्या लक्षात आलं तशी ती मनातल्या मनात म्हणू लागली, 'बहीण असावी तर अशी! आक्कासारखी! वास्तविक ती वासंतीची धाकटी बहीण होती, पण वासंतीनं प्रत्येक वेळी आपल्या इच्छा मारल्या होत्या आणि आपल्या बहिणीच्या इच्छा पुरविल्या होत्या हे तिनं ओळखलं होतं. 'नकटं व्हावं पण धाकटं होऊ नये' ही म्हण वासंतीनं आपल्या वर्तनानं कशी खोटी ठरविली होती या कृतज्ञ-भावनेच्या जाणिवेनं रेणुकेचं मन सदा भरलं होतं

वासंती पुण्याला कॉलेजात शिकायला गेली आणि रेणुका एकटीच सोलापुरात राहिली तेव्हा तिला काही तरी चुकल्या-चुकल्यासारखं वाटत राहिलं ते यामुळंच. आत्याची माया लाभली होती तरी बहिणीचं प्रेम दुरावलं असं तिला सारखं वाटे आणि वासंती सुटीत घरी आली की "आक्का आक्का" करीत ती तिच्या भोवती वावरायची ती एखाद्या नुकत्याच पंख फुटलेल्या पाखरासारखी. फार दिवसानी आपली लाडकी बहीण भेटली म्हणून वासंती तिचं कौतुक करायची, की फार दिवस भुकेलं राहिलेलं आपलं मन तिच्या सहावासानं तृप्त झालं म्हणून रेणुका तिला बिलगायची हे सांगणंच कठीण होतं.. एकदा येताना वासंती 'फिन्ले' मिलची दोन छान छापील पातळं घेऊन आली होती त्यातलं वर्तुळात रंगीत चौकोन छापलेलं पातळ तिला स्वतःला फार आवडलं होतं, पण रेणुकानं, 'मला दे ना हे' असं म्हणताच अगदी सहज प्रेरणेनंच वासंती म्हणाली होती, 'आवडलं ना तुला, मग घे !' जणु रेणुकाला जे हवं असेल ते द्यावं आणि तिला संतुष्ट मनानं हसताना पाहावं असं लहानपणापासूनच तिला वेड होतं

त्या दोघी जोडीनं वसतिगृहात राहायला आल्या तेव्हा तर त्यांच्या या आपुलकीला नवा बहरच आला आणि वसतिगृहातल्या












# ती तुझी उत्साहमूर्ती



ती तुझी उत्साहमूर्ती नित्य होई प्रेरक
ते तुझे चैतन्यदायी रूप जीवा तारक
रुक्ष रानी तूच केली अमृताची शिंपणी
दीप तू झालास माझ्या आंधळ्या या जीवनी
तूच येथे लावलेले वाढले हे रोपटे
पुष्पगंधे न्हाउनीया धन्य झाले चोखटे
तेज सूर्याचे खरे तू, तूच चंद्राची प्रभा
तू मिठी मारावयाला लाविले वेड्या नभा
तूच माझ्या जीवनाची धावणारी रे गती
मुक्ति देणारा सखा तू, बाण होई जीवितो !

—— सूर्यकान्त खांडेकर

मैत्रिणीना थट्टेला नवा विषय मिळाला. पण थोड्याच दिवसात रेणुकाच्या लक्षात आलं की आपली आक्का नेहमीपेक्षा थोडी अधिक अबोली झाली आहे. पदवी परीक्षेचा अभ्यास हे त्याचं कारण असावं असं प्रथम तिला वाटलं, पण तिच्या अबोलपणाला येत गेलेलं नवं स्वरूप तिच्या लक्षात येऊ लागलं तशी ती मनात म्हणाली, 'ही अशी का वागते आताशा ?'

तिला कळेना. पण तिच्या वागण्यात अलीकडेच येऊ लागलेला नीटनेटकेपणा आणि आपण चांगलं दिसावं म्हणून जाणून-बुजून ती घेऊ लागलेली दक्षता रेणुकाच्या दृष्टीतून सुटली नाही आणि ती स्वतःशीच पुटपुटली, 'ही कोणाच्या प्रेमाबिमात तर सापडली नाही ?'

या विचारानं ती स्वतःशीच दचकली होती. लहानपणापासून आत्यानं आपली सून म्हणून केलेला तिचा उल्लेख आणि बापू-वासंतीचा जोडा कसा लक्ष्मी-नारायणासारखा शोभेल' हा तिच्या मुखातनं अनेकदा ऐकू आलेला उद्गार आठवताच रेणुका कावरी-बावरी झाली होती. आत्यानं आपला सांभाळ केला नसता तर आपली काय अवस्था झाली असती हा विचार तिला काही केल्या मनावेगळा करता येत नव्हता, पण लगेच तिच्या मनात येत होतं, 'आक्काला बापूबरोवर लग्न करायचं नसलं तर आत्यानं आपला हेका सोडायला नको? अशी धरून-बांधून केलेली लग्नं सुखाची कशी होतील? '

पण आक्काच्या मनाचा नीट अंदाज लागत नव्हता तसं रेणुकाचं मन अधिकच गोंधळत होतं. तिला एकदा वाटे, 'आक्काला एकदा स्पष्टच विचारायला काय हरकत आहे ?' पण 'मोठ्या बहिणीला असल्या गोष्टी विचारायच्या का असतात धाकट्या बहिणीनं' हा विचार मनात येताच तिला स्वतःच्या मूर्खपणाचं हसू आलं होतं.

मात्र तिच्या मनातला हा गोंधळ संपला तो एकदा अकल्पितपणे. पडवलीच्या आपल्या शेतावर बसविण्यासाठी एक इंजिन विकत घेण्यासाठी म्हणून बापू पुण्याला आला होता. तसा तो आला की वसतिगृहावर यायचा आणि येताना आत्या काही तरी खाण्यासाठी मुद्दाम तयार करून डब्यातनं पाठवायची. वासंती पुण्यात एकटीच होती तेव्हाही बापू तिच्यासाठी येताना काही घेऊन यायचा, आत्याचा काही निरोप असला तिला सांगायचा, एखाद वेळेस रेणुका त्याच्याबरोबर आक्काला पत्रही धाडायची. बापूविषयीची आक्काच्या मनातली अढी तिला ठाऊक नव्हती असं नव्हे, पण आत्याच्या देखत साऱ्या तोंडदेखल्या गोष्टी तिला कराव्याच लागत.

या वेळीही आत्यानं खाऊचा डबा पाठविला होता, पण बापू आला तेव्हा वासंती बाहेर गेली होती. 'गावात आपल्या मैत्रिणीकडे गेली आहे' असं रेणुकानं त्याला सांगितलं तसा तो म्हणाला होता, 'जाऊ द्या. पण उद्या कुठं जाऊ नकोस म्हणून सांग तिला. आपण तिघं सिनेमाला जाऊ तीनच्या.'

दुसऱ्या दिवशी बापू आला, तेव्हा वासंती अगोदरच निघून गेली होती, 'मला आज टच्युटोरिअल आहे ग!' असं ती जाताना रेणुकाला म्हणाली तेव्हा ती काय समजायचं ते समजली होती. बापूला चुकविण्यासाठी तिनं ही युक्ती काढली होती हे तिनं ओळखलं. तिच्या मनाचा कानोसा तिला पुन्हा एकदा लागला होता... मग ती स्वतः बापूबरोबर सिनेमाला गेली होती ती केवळ त्याला बरं वाटावं म्हणून, पण तरीही चित्रपटगृहातून बाहेर पडताना बापू म्हणाला होताच, 'केवढा छान चित्रपट वासंतीला चुकला, नाही?'

बापूच्या मनातली वासंतीविषयीची आपुलकी अशी हजार तऱ्हांनी प्रगट होत असलेली आज अनेक वर्षं ती पाहात होती, पण शक्य असेल तेव्हा ती बापूला टाळीत होती हेही तिनं पाहिलं होतं.

पण 'टच्युटोरिअल'चं निमित्त सांगून आक्का कुठं गेली होती हे तिला समजलं तशी ती दचकली होती. रात्री जेवणाच्या वेळी त्यांच्या शेजारच्याच खोलीत राहाणाऱ्या जयश्री श्रीखंडेनं वासंतीला विचारलं होतं, 'काय छान होता ना 'वेस्ट एंड'मधला चित्रपट?' जयश्रीचा तो प्रश्न ऐकून आक्काचा चेहरा कावरा-बावरा झालेला रेणुकाला दिसला तेव्हा हा विषय टाळायला हवा हे तिनं ओळखलं होतं आणि काहीतरी निमित्त सांगून ती तिथून सटकली होती, जणु आपल्या लक्षात काही आलंच नाही असं भासवीत! .पण आक्का अशी कां वागत आहे या विचाराचं शल्य तिच्या मनात टोचत होतंच. तिनं मग जयश्रीला एका बाजूला नेऊन खोदून खोदून विचारलं तसा सारा प्रकार तिला समजला होता. लक्ष्मी रोडवर "न्हिदम हाऊस" म्हणून रेडिओ विकण्याचं जे मोठं भपकेदार दुकान होतं

अनुक्रमणिका








ते चालवीत होता जयश्रीचा चुलत भाऊ. त्याची आणि वासंतीची ओळख जयश्रीनंच एकदा करून दिली होती आणि मग थोड्या दिवसातच जयश्रीच्या लक्षात आलं होतं की वासंती शरदच्या प्रेमात सापडली आहे, त्याच्या प्रेमासाठी वेडी झाली आहे, त्यांच्या गाठीभेटी पण होतच राहिल्या चांगलं वर्षभर हे चाललं होतं. आज ती 'ट्युटोरिअल'चं निमित्त सांगून 'वेस्ट एंड'ला गेली होती ती अशीच नेहमीसारखी !

वासंती सुटीत सोलापूरला यायची तेव्हा होणाऱ्या तिच्या उल्हसित वृत्ती, तिच्या वागण्यातला नीटनेटकेपणा आणि आपण चांगलं दिसावं म्हणून ती घेत असलेली दक्षता यांचा अर्थ जयश्रीच्या तोंडून सारी हकीगत ऐकल्यापासून रेणुकाला नीट समजला होता हे खरंच, पण एकदा शरदला पाहावं अशी तिच्या मनाची उताविळी होत होती हेही खरंच होतं. पण काही केल्या आपल्या आक्काला हे सांगण्याचा धीर तिला होत नव्हता.

म्हणूनच एकदा संधी साधून ती जयश्रीबरोबर 'व्हिदम हाऊस'मध्ये गेली होती आणि जयश्रीनं तिची ओळख करून देताच शरद असा काही प्रसन्न मनानं हसला होता की रेणुकाला लाजल्या-सारखं झालं होतं. पुरुषाचं इतकं प्रसन्न पण मुग्ध हास्य आज जणु काय तिच्या प्रथमच दृष्टीस पडलं होतं आणि कळ्यातील सुगंधाचे निःश्वास नाकातोंडात जाताच माणसाचं मन मोहरून जावं तसं तिचं झालं होतं. 'किती उंच, देखणा, गोरापान, हसतमुख आहे ! अशा माणसाचा आक्काला मोह पडला तो काही उगीच नाही. कुणालाही पडेल!' असं ती स्वतःशीच म्हणाली आणि आपल्या मनातले हे शब्द कुणाला ऐकू तर गेले नसतील या खात्रीनं स्वतःशीच मुग्धपणे हसली होती. रेणुकाचं बोलणं, तिची धिटाई, तिच्या दृष्टीतला मुग्ध भाव दृष्टीस पडताच शरदही जणु भांबावला होता आणि जयश्रीला म्हणाला होता, 'ही वासंतीची बहीण म्हणतेस ? सख्खी? वासंती तिचं उठल्या बसल्या कौतुक करते ती ? '

जणु एका क्षणात वासंतीशी त्यानं तिची तुलना केली होती आणि ती वासंतीची धाकटी बहीण आहे याच्यावर त्याचा विश्वासच बसत नसल्यासारखा उद्गार त्याच्या मुखातून न कळत बाहेर पडला होता. रेणुकाला त्याचा तो उद्गार ऐकून मोठं नवल वाटलं होतंच, पण त्याचं ते लाघवी बोलणं ऐकत राहावंसच तिला वाटलं होतं.

ती परत आली होती ती उल्हसित मनानं. आक्काची निवड चुकली नाही या खात्रीनं. स्वतःला झालेला आनंद आक्काजवळ व्यक्त केल्यावाचून तिला राहवलं नाही आणि तिचे दोन्ही हात हातात घेत ती म्हणाली,

"तुझं गुपित मला समजलं हं आक्का !

वासंतीनं मोठे डोळे केले आणि ती म्हणाली,

"म्हणजे तुझ्यापर्यंत पोचली का बातमी ? "

तिचं ते बोलणं ऐकून जयश्रीला हसू आवरलं नाही आणि ती म्हणाली,



[अनुक्रमणिका](#)







"मांजर डोळे मिटून दूध प्यालं, तरी जगाचे डोळे उघडे असतात बरं का, आक्काबाई!"

सगळ्या जणी मोठ्यानं हसल्या तसं वासंतीचं अंग मोहरलं होतं

रात्री आपापल्या कॉटवर पडल्या पडल्या दोघी वहिणींच्या गोष्टी चालल्या त्यात हाच विषय मग सारखा निघाला होता. 'पाचूचा खडा हातात मिळाल्यावर काचेचा तुकडा कोण हातात धरील?' असं रेणुका म्हणाली ते वापूला उद्देशूनच होतं हे लक्षात येताच वासंतीचं मन सुखावलं होतं आणि रेणुकानं या विषयावद्दलसारखं बोलत राहावं अशी नवी भूक तिच्या मनाला लागली होती.

महिनें न् महिनें हे असं चाललं होतं. वासंतीचं शरदवरचं प्रेम हा आता कौतुकाचा विषय राहिला नव्हता. ते आता सारं जुनं झालं होतं. जयश्री मात्र तिला सारखी डिवचीत होती आणि म्हणत होती, "शरदच्या घरची गरीवी आहे आणि या वयातच त्याला टक्कल पडू लागलंय ते सारं नीट पाहून घे हं, नाहीतर उद्या नणंदेच्या नावानं लाखोली वाहशील!"

जयश्रीचं ते बोलणं न रुचल्यासारखी वासंतीची मुद्रा क्षणात झाली होती आणि ती म्हणाली होती, "श्रीमंती काय पैशातच असते होय? आणि टक्कल पडू लागणं हे तर येऊ घातलेल्या भाग्याचं प्रसादचिन्हच! उद्या पिंपरीला शरदनं रेडिओच्या स्पेअर पार्टसचा कारखाना सुरू केला आणि–"

शरदचं काही उणं ऐकायलाच ती तयार नव्हती. शरदनं जणु तिचं जीवन व्यापलं होतं. रेणुका हे सारं पहात होती आणि एकीकडे ती हर्षभरीत होत होती, तर एकीकडे तिच्या या भाग्याचा न कळत तिला हेवा वाटत होता.

एकदा तर वासंतीनं आपल्याबरोबर नाटकाला येण्याचा आग्रह तिला केला तेव्हा रेणुका म्हणाली होती,

"मी कशाला येऊ? दोघात तिसरं आलं की अडचण होते नाही?"

"समजलं, समजलं, पण शरदनंच सांगितलंय तुला घेऊन यायला. तीन तिकिटंसुद्धा त्यानं काढून ठेवलीत..."

रेणुकाचा नाइलाज झाला होता. ती गेली होती, पण तिला अगदी अवघडल्यासारखं झालं होतं. आपण आक्काचं उगीचच ऐकलं असं तिला वाटलं होतं, पण तिच्या मनाचा हा संकोच शरदनं घालवला होता. 'तुला एस्. एस्. सी. ला शंभरातले शंभर मार्क मिळाले गणितात असं म्हणून तिच्या हुषारीचं कौतुक त्यानं सारखं चालविलं होतं; आणि तिच्या फुलाफुलांच्या सुंदर पातळाकडे पाहात तो म्हणाला होता, 'तुला कुठे छान छान पातळं मिळतात ही? तुझ्या आक्काला घेऊन दे की असली!' त्याच्या त्या बोलण्याचं रेणुकाला हसू आलं होतं आणि ती म्हणाली होती, "तिला नाही आवडत असली पातळं!"

कां कुणास ठाऊक, पण नाटकाहून आल्या दिवसापासून आक्काचं मन अस्वस्थ झालं होतं हे रेणुकाच्या लक्षात आल्यावांचून राहिलं नाही. आक्काला अगोदरच फारसं बोलायला नको, त्यात कधी काही तिच्या मनाविरुद्ध घडलं की ती अबोलच होत असे हे आज इतकी वर्षं रेणुका पहात होती त्यामुळे आक्काच्या या वागण्याचा अर्थच तिला कळेनासा झाला होता. तिच्या आणि शरदच्या भेटी-गाठी कमी कमी होत होत्या तसं रेणुकेच्या मनात येत होतं, 'हिच्या मनात तरी काय आहे?

एकदा तर त्यानी तिघानी मिळून पिंपरीला शरद रेडिओच्या स्पेअर्स पार्टस्‌चा जो कारखाना सुरू करणार होता ती जागा पाहाण्यासाठी जायचं आधी दोन दिवस ठरविलं असूनही आयत्या वेळी वासंती कुठे तरी निघून गेली होती. रेणुकाजवळ ती काही बोललीसुद्धा नव्हती, पण परत आल्यावर ती रेणुकाला म्हणाली होती,

"तू त्याच्यावरोबर गेलीस हे बरं झालं—"

"मी नाही म्हणत होते, पण ते ऐकेनातच. मला वाटलं, तू येशील. चांगली अर्धा तास वाट पहात बसले ते गाडीत, गाडी फाटकाजवळ उभी करून, तशी मी म्हणाले, "जा तुम्ही. आक्का काही सांगून गेली नाही मला कुठे जाणार होती ते."

मी असं म्हटलं तेव्हा ते म्हणाले, 'ती नसेल तर तू चल की, तू सुद्धा तिच्यासारखीच आहेस, लहरी?' ते असं म्हणाले तसा माझा नाईलाज झाला. मी गेले ती तुझ्यासाठी. उद्या तू मालकीण होणार आहेस की त्या कारखान्याची..

"बरं झालं गेलीस ते! छान आहे ना जागा?

"अग, छान म्हणजे काय, अप्रतिम आहे अगदी! शरद मोठे दूरदर्शी आहेत, आक्का! उद्या कारखाना वाढला तर आणखी चार इमारती आणि एखादा छोटासा बंगलासुद्धा राहाण्यासाठी बांधता येईल येवढी मोठी जागा आहे!

रेणुका बोलत होती, पण आक्काचं आपल्या बोलण्याकडे फारसं लक्षच नाही हे लक्षात येताच तिचं मन खट्टू झालं. शरदवरोबर जायची कुठून आपल्याला दुर्बुद्धी झाली असं तिला वाटलं आणि ती म्हणाली,

"आपण तिघानी पुन्हा एकदा जायचं हं पिंपरीला. मीच सांगते शरदना पुन्हा भेटले म्हणजे. माझं ऐकतीलच ते!

पण आश्चर्य असं, की असं सांगण्याची वेळच आली नाही! एके दिवशी रेणुका कॉलेजातनं येताच वासंती तिला म्हणाली,

"आत्या फार आजारी आहे ग सोलापूरला."

"खरंच?"

"होय, हे बघ बापूचं पत्र आलंय्..."

रेणुकानं ते पत्र वाचलं तशी ती म्हणाली, "आता काय करायचं ग?..."

"मी जाते संध्याकाळच्या मद्रास एक्सप्रेसनं. आत्यानं आपणाला वाढवलं, आजारीपणात तिची सेवा-शुश्रुषा हवीच करायला. बापूनं काय लिहिलंय, पाहिलंस? 'तिनं तुझा ध्यास घेतलाय रात्रंदिवस!' न जाऊन कसं चालेल ग अशा वेळी?" ..असं म्हणताना तिचा कंठ सद्गदित झाला होता, पापण्या ओलावल्या होत्या...









सध्याकाळच्या गाडीनं वासंती खरोखरच गेली होती. स्टेशनवर तिचं आणि रेणुकाचं बोलणं चाललं होतं ते सारं आत्या-बद्दलच. 'आता फार थकलीय ती. कष्ट होत नाहीत तिच्यानं, पण सारा दिवस हातानं काही ना काही सुरू असतं. '

काहीतरी बोलायचं म्हणून रेणुका म्हणाली,

"त्यात तुझ्यावर तिचा सारा जीव! "

"बापूनं लिहिलंच आहे ना, तिनं माझा रात्रंदिवस ध्यास घेतलाय म्हणून?. "

गाडी हलली तशी रेणुका मोठ्यांदा म्हणाली, "उद्याच पत्र लिही आत्याचं कसं आहे ते!

दोन दिवसानी खरोखरच वासंतीचं पत्र आलं – 'आत्याची प्रकृती दिवसेंदिवस खालावत चाललीय. मी आठवडाभर तरी राहीन...'

"आठ दिवसानी ती परत आली होती, पण रेणुका भेटल्या-बरोबर ती तिला म्हणाली,

"दोन चार दिवसानीच मी परत जाणार आहे सोलापूरला!"

"तू परत जाणार ? कॉलेज बुडवन ? "

"होय, कॉलेज सोडणार, परत जाणार आणि तियंच राहाणार. "

"काय सांगतेस काय तू हे, आक्का ?

"अजून सगळं सांगितलंच नाही मी तुला, रेणु !"

"म्हणजे ? ..."

"मी सोलापूरला जाणार, तियंच राहाणार, बापूशी लग्न-सुद्धा करणार! "

आपण काय ऐकत आहो हेच रेणुकाला कळेना. जे कानावर आलं होतं त्यानं तिला धक्का बसला होता. तिचं मन सुन्न झालं होतं. आक्का बापूशी लग्न करणार? शरदवरचं आपलं प्रेम ती विसरणार? हे कसं शक्य आहे? तिला वाटलं, उठावं, शरदना जाऊन गाठावं आणि त्याना सांगावं, "आक्का काय करायला निघालीय बघा तरी! तिला आवरा, तिची समजूत काढा...

पण ती क्षणात सावध झाली आणि म्हणाली,

"आक्का, आक्का, काय सांगतेस ग हे? तू बापूशी लग्न करणार? ..."

"होय, रेणु. आत्याच्या जीवाला अंतकाळी यातना होतील असं माझ्या हातून काही घडता कामा नये. तिनंच तुला आणि मला वाढविलं, मग ती सांगते ते नको ऐकायला? "

वासंती जे जे सांगत होती ते ऐकून रेणुकाच्या मनाचा थरकाप होत होता. आक्का बापूशी लग्न करणार? तो नेमळट होता ना?

ढेरपोट्या होता ना? ऐतखाऊ होता ना? असल्या माणसाबरोबर लग्न करण्यापेक्षा मी आगगाडीखाली जीव देईन असं आजवर ती म्हणत होती, मग आताच काय चमत्कार घडला? केवळ आत्या म्हणते म्हणून स्वत:चा बळी द्यायला आक्का तयार झाली? कुणास ठाऊक?

काय बोलावं हे रेणुकाला सुचत नव्हतं. आक्कानं जे ठरवलं होतं ते शरदना कळलं तर केवढा घात होईल या कल्पनेनंच ती हादरली होती. हे सारं शरदना कोण कळविणार, कसं कळविणार, तिला काही कळत नव्हतं. रेणुकाला वाटलं, आक्काचा नवा निश्चय त्यांना कळला की त्यांची सारी स्वप्नं क्षणात धुळीला मिळतील. त्यांनी कसले कसले किल्ले मनात बांधले आहेत! कारखाना काढायचा, बंगला बांधायचा, हे करायचं आणि ते करायचं! पण बेत कळला की वाऱ्याच्या एका झुळकीनं पत्त्यांचा आक्काचा बंगला कोसळावा तसं त्यांच्या आयुष्याचं होईल! छे: छे, विचारसुद्धा करवत नाही! आपल्या वागण्यानं आक्का त्यांच्या साऱ्या जीवनाची राखरांगोळी करणार आहे या विचारानं तिचं मन अगदी गुदमरून गेलं आणि ती म्हणाली, त्यांच्या प्राणाशी असा खेळ खेळताना आक्काच्या मनाला यातना कशा नाही होत? ती एवढी थंड कशी? म्हणे मी सोलापूरला जाणार, तिथंच राहणार, बापूशी लग्न सुद्धा करणार! आक्का, आक्का अशी कशी ग तू?— दुसऱ्याचा विचारसुद्धा तुझ्या मनात कसा येत नाही?

रेणुकाच्या मनातली विचारांची ही गुंतावळ वाढत होती तसं तिला वाटत होतं, निदान जयश्रीला तरी सांगायला हवं सारं. आक्कानं कुणाचं ऐकलंच तर ती जयश्रीचंच ऐकेल.

पण जयश्रीलासुद्धा हे सारं कसं सांगायचं, हे तिला कळत नव्हतं. आक्कानं जे ठरवलं होतं ते ऐकलं की जयश्रीला केवढा धक्का बसणार होता हे तिला माहीत होतं, पण तिला ते सांगितल्याशिवाय गत्यंतरही नव्हतं हेही तिला ठाऊक होतं. तीच या परिस्थितीतून काही मार्ग काढू शकेल असं तिला वाटत होतं . . .



पण हा तिचा समजही चुकीचाच ठरला होता, कारण सांगता येईल तेवढ्या स्पष्टपणानं साऱ्या गोष्टी रेणुकानं तिला सांगितल्या होत्या तेव्हा खिन्नपणे ती म्हणाली होती,

"तुझ्या आक्कानं बापूशी लग्न करायचं ठरवलंच असेल, तर तिला आपल्या मार्गानं जाऊ देण्यातच शहाणपणा आहे, रेणु! प्रेमाची सक्ती अशी कधी कुणावर करताच येत नसते. आणि ज्याच्याबद्दल तिरस्कार वाटतो त्याच्याबद्दलच एकाएकी आपुलकी आणि प्रेम माणसाला कसं वाटू लागतं हेही कधी सांगता येत नाही. माणसाचं मन हे एक मोठं विचित्र गूढ आहे. आमचे मानसशास्त्राचे प्राध्यापक सांगत असतात की माणसाच्या मनाचे गूढ व्यापार अजून सहस्त्रांशानंही उलगडलेले नाहीत तेच खरं वाटू लागतं अशा गोष्टी पाहिल्या म्हणजे. म्हणून म्हणते की तू स्वस्थ राहा. जे घडते आहे ते सारं शरदला आपोआप कळेल, मुद्दाम त्याला कशाला जाऊन सांगायचं?

जयश्रीच्या सांगण्याप्रमाणेच रेणुका वागली खरी, पण आक्काच्या वागणुकीनं तिच्या मनाला जो धक्का बसला होता त्यातून तिला स्वत:ला सावरताच येत नव्हतं, माणसांच्या वागण्याचा अर्थच तिला नीट लावता येत नव्हता.

आक्का सोलापूरला गेल्यापासून रेणुकाला अगदी एकटं एकटं वाटत होतंच, पण शरदला भेटावं, त्याला साऱ्या गोष्टी सांगाव्या, त्याच्या दु:खावर फुंकर घालावी असं तिला सारखं वाटायचं, पण त्याच्याकडे जायचा धीर काही तिला व्हायचा नाही. आपण असं वागलो तर ते त्याला कितीसं आवडेल याचा अंदाज तिला घेताच यायचा नाही . . .

आक्काची पत्रं मधूनमधून येत त्यावरून आत्याची प्रकृती सुधारत होती, बापू मोटार घ्यायचा बेत करीत होता, लग्न करायची घाई आत्या करीत होती, या गोष्टी तिला कळत होत्या, त्यावरून तिला वाटत होतं की एके दिवशी लग्नाची तारीख निश्चित झाल्याचं आक्काकडून कळणार.

अखेर तसंच झालं आणि रेणुका सोलापूरला गेली ती आक्काच्या वागण्यानं भांबावलेल्या मन:स्थितीत. पण घरातलं प्रसन्न वातावरण, आपादमस्तक बदललेला बापू आणि येणाऱ्या सुखाच्या कल्पनेनं भारावलेली आक्का तिच्या दृष्टीस पडताच तिच्या मनाची खिन्नता मावळली आणि विवाहाच्या मंगल सोहळ्यात ती सारं विसरली. बापूचं नाव घेताना आक्कानं घेतलेला एक गोड उखाणा आठवून तर ती मनात सारखी म्हणत होती, 'बापूचा तिरस्कार करण्याचं सारं नाटकच चालवलं होतंस का ग तू इतकी वर्षं . . .? तुला तो खरंच आवडत होता? मग शरदसाठी तू येवढी वेडी झाली होतीस, त्याच्यावरून आपल्या पंचप्राणाची कुरवंडी करून टाकीत होतीस, त्याचं बोलणं-हसणं पाहून हर्षभरित होत होतीस हे सारं खोटंच होतं? नाटक कुठलं, ते की हे?'

रेणुकाला काही कळत नव्हतं. पुण्याला परत यायलाच हवं म्हणून ती आली होती, पण जयश्रीला भेटायचीही तिला लाज

# फॉस्फोमिन-



## अधिक उत्साह देते. भूक वाढविते. जोम वृद्धिंगत करते. शरीराची रोग-प्रतिकार-क्षमता वाढविते





### खरोखर!...

### फॉस्फोमिन म्हणजे घरकुलांतील आरोग्याचे कारंजे!




व्हिटॅमिन बी कॉम्प्लेक्स आणि विविध ग्लिसरोफॉस्फेटस्युक्त उत्तम फलास्वाद असलेले हिरव्या रंगाचें टॉनिक—फॉस्फोमिन

SQUIBB® TTT®

® हा ई. आर. स्क्विब अ‍ॅण्ड सन्स, इन्कॉर्पोरेटेड, यांचा रजिस्टर्ड ट्रेडमार्क आहे व करमचन्द प्रेमचन्द प्रायवेट लि. यांना तो वापरण्याचे लायसन्स आहे

SARABHAI CHEMICALS

Shilpi SC 50 A/67 Mar






वाटत होती. आक्का आपल्या मार्गानं गेली, पण शरदच्या प्राणाशी ती अकारण निर्घृण खेळ खेळली या विचारानं तिचं मन कष्टी झालं होतं, ती मनात म्हणत होती, केवढा उंच, देखणा, गोरापान, हसतमुख जीव! त्याच्या उमलत्या जीवनाची कळी कुस्करून टाकताना तुला त्याची दया यायला हवी होती, आक्का! पण तू तर त्याची प्रीती पायाखाली तुडवीत बापूच्या हातात हात घालून खुशाल बंगलोरला 'हनीमून'ला निघूनही गेलीस ! आक्का, आक्का, तुझ्या हातून हे घडलं तरी कसं ग !

पुण्याला परत आल्याला आठवडा झाला तरी रेणुकाच्या मनातलं वादळ शांत झालं नव्हतं. अभ्यासात तिचं लक्ष लागत नव्हतं. मैत्रिणींशी गप्पागोष्टी कराव्याशा तिला वाटत नव्हत्या. हे सारं झालं तरी कसं हे कोडंच तिच्या मनाला उलगडत नव्हतं . .

. . .आणि मग तिच्या मनातला संभ्रम संपला तो अचानक आक्काचं पत्र आलं तेव्हा! पण पत्र वाचून संपताच रेणुकाच्या मनात नवंच वादळ उठलं आणि ती स्वतःशीच म्हणाली, "आक्का, आक्का काय केलंस ग हे ? "

आक्कानं लिहिलं होतं—

"प्रिय रेणु,

. . .जे घडलं त्याचा आता निवांतपणे विचार केल्यावर मला वाटतं, जे झालं तेच चांगलं झालं, नव्हे असंच व्हायला हवं होतं!

खरं सांगू तुला, रेणु ? बापूचा खरंच मला राग यायचा, त्याचा तिरस्कार वाटायचा. आपणाला आत्यानं वाढविलं त्या असहाय्यतेचा तो फायदा घेऊ पाहातोय असं वाटायचं. त्यातच त्याचा नेभळटपणा, काही एक न करता आळशीपणानं जगण्याची प्रवृत्ती आणि त्याच्या शरीराला येत जाणारा बेढबपणा यामुळं तो अगदी दृष्टीसमोरसुद्धा नकोसा वाटायचा मला.

शरदची आणि माझी गाठ पडल्यानंतर तर दोघांची तुलना माझं मन सारखं करायचं. शरद दिसला की माझं मन मोहरायचं, शरीर रोमांचित व्हायचं! माझ्या भाग्याचा मलाच हेवा वाटायचा. त्याच्यासाठी जीव तडफडायचा, पण. पण. काय सांगू तुला रेणु, माझ्या हळूहळू लक्षात येऊ लागलं माझं हे सारं प्रेम एकांगी आहे. त्याच्या भेटीसाठी उत्सुक होऊन, डोळ्यात प्राण आणून मी त्याची वाट पहात बसायची, पण अशा भेटीसाठी तो उतावीळ झालेला मला कधीच दिसेना तेव्हा मला वाटू लागलं, माझंच काही नाही ना चुकलं? शरदच्या तोंडून माझ्या कौतुकाचा शब्द कधी ऐकू आला नाही की हौसेनं मला तो कधी कुठे घेऊन गेला नाही. मी सिनेमाला जाऊ या म्हटलं की यायचा, नाटकाची तिकिटं काढ म्हटलं की काढायचा, पण आपण होऊन कधी काही करील तर शपथ! असं हे सारखं सारखं होऊ लागलं तसं मला वाटू लागलं, माझ्या प्रेमाची सक्ती तर मी त्याच्यावर नाही करीत ?

ही जाणीव मोठी भयानक होती, रेणु, फार भयानक होती! आपल्या प्रीतीचं बीज खडकावर पडलं आणि त्याला प्रतिसादाचे कोंभ आले नाहीत की जीवाची जी तगमग होते ती कधी सांगून कुणाला कळायची नाही. ती सांगताच यायची नाही. या तगमगीत माझं मन होरपळू लागलं होतं, तरीही शरदला आवडतील अशा गोष्टी मी करू लागले, चांगली राहू लागले, त्याच्या मनाला आज ना उद्या प्रीतीची पालवी फुटेल म्हणून वाट पाहू लागले, पण सारं व्यर्थ ठरलं!

नेमकी याच वेळी तू पुण्यात आलीस आणि. आणि रेणु, होऊ नये ते झालं! तुझ्या न कळत झालं! शरदचं जे कौतुक आपल्या वाट्याला यावं म्हणून माझं मन भुकेलं होतं ते कौतुक तुझ्या वाट्याला येऊ लागलं. तुझ्या हुषारीचं कौतुक, तुझ्या पातळाचं कौतुक या कौतुकानं तुझं मन हरखलेलं मी पाहिलं तसा मला धक्का बसला. पण मग जे मला मिळालं नाही ते तुला मिळत आहे यातच माझ्या मनाला आनंद मानायला मी शिकविलं आणि अखेर तुझी आणि शरदची परीक्षाच घ्यायचं मी ठरविलं. एकदा पिंपरीला कारखान्याची नवी जागा पाहायला आपण तिघानी जायचं ठरविलं होतं, आठवतं तुला? मी मुद्दामच तुला न सांगता निघून गेले ते तुम्ही दोघं कशी वागता हे पाहण्यासाठीच! आणि काय सांगू तुला रेणु, जे नको ते घडलं. त्यानं तुला पिंपरीला येण्याचा आग्रह केला तर तू कशी वागतेस हे पाहून मी तुझी परीक्षा घेणार होते. 'आक्का नाही तर मी येणार नाही!' असं तू म्हणशील अशी माझी अपेक्षा होती, ती तू त्याच्या गाडीतून गेल्यामुळं पार धुळीला मिळाली. रेणु, पार धुळीला मिळाली . . . परस्परांचा सहवास तुम्हा दोघानाही हवा होता असं मला वाटे. तो तुम्ही न बोलता घेतलात यातच मी काय समजायचं ते समजले; आणि त्याच क्षणी मी मनाशी ठरविलं



अनुक्रमणिका

की, आपल्या प्रीतीची सक्ती शरदवर करणं हा मूर्खपणा आहे. जे तुला हवं आहे ते तुला मिळत असेल तर तुझा मार्ग मोकळा करून द्यायचा हेच मग माझ्या मनानं घेतलं. . माझं प्रेम त्याला नको होतं पण या पाचूच्या खड्याला तुझ्या जीवनाचं कोंदण हवं होतं हे मी ओळखलं. ही जाणीव मोठी दुःखाची होती, पण तिच्या यातना मुकाट्यानं सोसाण्यावांचून गत्यंतरच नव्हतं. रेणु! गत्यंतर नव्हतं!

माझ्या या मानसिक अवस्थेत असताना आत्या आजारी असल्याचं बापूनं कळविलं आणि 'तिनं तुझा ध्यास घेतलाय रात्रंदिवस' असं लिहिलं तेव्हा एका क्षणात त्याच्या या लिहिण्याचा अर्थ माझ्या लक्षात आला. जीव गेला तरी मी बापूशी लग्न करायला तयार होणार नाही हे आत्याला ठाऊक होतं. 'वासंती तयार नसेल तर जन्मभर मी तसाच राहीन, आई!' असं बापू सारखा म्हणत होता. मुली पाहायचंच नाकारीत होता, हेही मला ठाऊक होतं. अशा परिस्थितीत आत्या आजारी पडली. आपण आता जगत नाही, आता हे आपलं अखेरचंच दुखणं असं तिला वाटू लागलं तशी बापूच्या लग्नासाठी तिनं हाय खाल्ली अगदी. बापूचं लग्न झालं नाही तर पडवलीच्या कुळकर्ण्यांचा निर्वंश होणार या विचारानं तिची झोप उडाली आणि 'वासंतीला बोलाव' 'वासंतीला बोलाव' असा हट्टच तिनं बापूजवळ धरला. मी घरात पाऊल टाकलं तशी मला मिठी मारून आत्या अशी काही ओक्साबोक्शी रडली, की माझ्या काळजाचं पाणी पाणी झालं. आत्यानं शब्दानं मला काही सांगितलं नाही, पण तिच्या अश्रूंनी तिच्या मनातला शब्द न् शब्द मला सांगितला. बापू आज इतकी वर्षं माझी मनधरणी करीत होता, माझं मन वळवू पहात होता, पण मीच निर्धारानं त्याला नकार देत आले होते. पण ज्या शरदवर मी प्राणा-पलीकडे प्रेम केलं त्यालाच माझं प्रेम नको आहे आणि तुझ्या मनाची मुळं त्याच्या प्रीतीचा ओलावा शोधीत आहेत हे मी ओळखलं तसं मला वाटलं, तुझ्या मार्गातून बाजूला व्हायला ही केवढी लाख-मोलाची संधी आहे! मी आठवडाभर आत्याजवळ राहिले तशा नव्या नव्या गोष्टी माझ्या दृष्टीस पडल्या. बापूची माझ्याबद्दलची निष्ठा आणि भावडेपणा पाहून तर माझं मन शरमिंदं झालं. लहानपणा-पासूनच त्यानं माझ्या प्रीतीची पूजा केली होती आणि ती मिळत नाही असं पाहताच एक प्रकारच्या औदासिन्याची काजळी त्याच्या जीवनावर आली होती. त्याला काही करावसंच वाटत नव्हतं. धडपड कशासाठी आणि कुणासाठी करायची असं त्याच्या मनानं घेतलं होतं. त्याचा निरुद्योगीपणाचा, त्याच्या ऐतखाऊपणाचा हा नवा अर्थ माझ्या लक्षात आला तसं माझं मन कळवळलं आणि आत्याला मी म्हणाले, 'तुझ्या शब्दाबाहेर नाही मी, आत्या!' माझ्या या शब्दानी घरातलं औदासिन्याचं मळभ एका क्षणात नाहीसं झालं आणि प्रसन्नतेच्या प्रकाशानं सारं घर भरलं. .

. . . आता हे सारं होऊन गेल्यावर मागे वळून पाहताना मला वाटतं जे योग्य तेच मी केलं. जे तुला हवं आहे असं मला वाटलं ते



# अबोल गीते

येथेच आसवानी भिजली अबोल गीतें
भावात वंदना ती, गीतार्थ आर्त होतें ॥ ध्रु ॥

येथेच स्तब्ध होती, फुलबाग सांजवेळी
प्रेमात दंगलेली वेडी, खुळी अबोली
होता बसून पक्षी, रंगात धुंद राणी
पानी दडून बसले बेभान सूर होते ॥ १ ॥

निश्वास तें कळघांचे, चित्तात साठलेले
ओठास देत होतें, मृदु स्पर्श गंधितेचे
स्वप्नातल्या प्रियेचे, जणु चित्र आज ओले
बिंबित प्रेमरागा, स्वप्नी पडून होतें ॥ २ ॥

भावुक दोन डोळे, होतें मिटून गेले
चित्तातल्या व्यथेला शोधीत मात्र बसले
होता खुळ्या मनाचा, निर्जीव एक चाळा
होती वृथाच आशा, ओठात कंप होतें ॥ ३ ॥

बिलगून रात्र बसली, अंधार थांबलेला,
अनुराग आणि होता, विळख्यात माळलेला
'धडकन्' तिथे दिलाची होती सदैव जागी
जागेच झोपलेले ते एक शिल्प होते ॥ ४ ॥

विरहात रात्र सारी होती सरून गेली
येता पहाटवारा कानी लकेर आली
ओल्याच वेदनेला आसु फुलारलेले
ते जीव दोन ओले, कंपात व्यस्त होते ॥ ५ ॥

— अशोक परांजपे

मिळवण्याची तुला संधी देऊन आणि जे बापूला हवं होतं ते त्याला देऊन मी कृतार्थ झाले या आनंदात मी आज आहे, रेणु! जीवनाचा अर्थ त्यागानं कळतो, भोगानं नव्हे, हे ज्या क्षणी मला उमजलं त्याच क्षणी मला माझा पुनर्जन्म झाला आणि जीवनाची नवी वाट मला दिसली. त्या वाटेनंच मी आता जाईन आणि सुखी होईन, अशी माझी श्रद्धा आहे.

यापेक्षा यावेळी तरी मला अधिक काही सुचत नाही.

तुझी,
आक्का."

रेणुकानं पत्र वाचून संपविलं तसं भावनावेगानं आपलं मन गुदमरल्यासारखं तिला वाटलं आणि ती स्वतःशीच पुटपुटली,

"आक्का, कुणी शिकवलं ग हे सारं शहाणपण तुला, कुणी शिकवलं? . ."

मात्र हे शब्द तिच्या ओठातून बाहेरही पडले नव्हते. तिचे डोळे मात्र अश्रूंनी डबडबले होते! ● ● ●








# रसिकहो, परिसा परवड कथा

नारदमुनि 'बटाटयाची चाळ' पाह्यला स्वर्गातून येतात, पण 'हाऊस फुल्ल' बोर्ड पाहून निराश होतात तेवढयात एक भक्त त्याना 'कांद्याची चाळ' दाखवितो तेथे त्याना काय आढळते ?...




विनोदी संगीतिका

ह. शि. खरात

**चाळकरी :–** नारदा कां आला खाली ?
स्वर्गामधली टाकुन कामे या भलत्या वेळी.
देवांचे तुम्ही देवगुरु
सेवा तुमची काय करु
काय घेता लवकर बोला चहा, कॉफी, केळी.

**नारद :–** बटाटयाची चाळ बघाया
आलो खाली पृथ्वीवर या
चाळ मानवा दाखव मजला आहे तरी कसली.

**चाळकरी :–** 'सॉरी' देवा क्षमा करावी

**नारद :–** अडचण भक्ता मज सांगावी

**चाळकरी :–** 'हाऊसफुल्ल'ची पाटी देवा दारांवर लागली.

**नारद :–** कशास मजला तिकीट हवे पण

**चाळेकरी :–** प्रवेश नाही तिकीटावांचून
फुकटयाना परि देवा येथे आहे बंदी केली.

**नारद :–** नारायण ! नारायण !
उगीच मी आलो स्वर्गातुन.

**चाळकरी :–** आलात देवा परत न जावा
चाळ आमुची बघुनी जावा
बटाटयाची नच परि कांद्याची जाहो चाळ पाहून.

**नारद :–** भक्ता इच्छा पुरी कराया
चल येतो मी चाळ बघाया
सांग मला तू कथन करुनि आणि दाव हिंडून.

* *

**चाळकरी :–** या, कांद्याच्या चाळीमध्ये देवगुरु नारदा
आपुल्या करितो मी स्वागता.
चाळ आमुची कांद्याची
जरा वाकल्या बांध्याची
आधाराला खांब आणखी जिना 'पूल झुलता.'
खच्चून भरल्या गाळयांची
डोईजड दो माळयांची
मध्येच आहे जिन्याखालती संसारहि वाढता.
खाली दुकान वाण्याचे
वरती आहे गाण्याचे
माल आणखी ताल 'किराणा' अशी एकतानता.
इथे नळाला नसते पाणी
परि डोळयाना येते पाणी
एक बादली भरता भरता जीव जाई पुरता.
कवि, कारकून, मास्तर कोणी

अनुक्रमणिका







सभ्य नि सोदे 'दादा' कोणी
खच्चून भरले नगासनगहो गाळीव नरसंपदा.

*

**नारद :–** नारायण ! नारायण !–
भक्ता ही कसली गर्दी
सांग कशास्तव जमल्या नारी उदासीन नेत्री.

**चाळकरी :—** पाण्यासाठी नळाभोवती
जमल्या साऱ्या ह्या दमयंती
नळाला त्याची ना वर्दी.
ऐका देवा कान देवून
नळावरील ते संभाषण
त्यातले देवा तुम्ही दर्दी.
[स्थळ–नळ.]

**एक महिला :–** सखये, बघशी कुणाची वाट ?

**दुसरी :–** नळराजाची वाट पाहते वाजून गेले आठ.
जल थेंबाचा एकहि पण
घरात नाही सकाळपासून
त्यात ह्याना लवकर आहे जायाचे हपिसात.

**तिसरी :–** नकोस वाई सांगू काही
घरी आमुच्या तेच वाई
दोन दिसांचे धुणे साचले ढीगभर आज घरात.

**पहिली :–** कशी दिसेना आज भवानी ( भांडकुदळवाई)

**दुसरी :–** निद्रा घेत असेल अजुनी

**तिसरी :–** लवकर येरे तू नळराजा येईल ती निमिषात.

**भांडकुदळबाई :–** ( येऊन )
माझी बादली मागे सारुन
कुणी केले हे निलाजरेपण
लवकर बोला नातर होईल शिव्यांचीच बरसात.

**चाळकरी :–** लवकर देवा पाय काढा
उडेल नातर उगी शितोडा
नळामुखीचे पाणी पळाले काय आपुली बात.

* *

**नारद :–** नारायण ! नारायण !
भक्ता हे कसले सूर
कोण रडते आहे अवेळी होऊनि चिंतातुर

**चाळकरी :–** चाळीमधला गायक गातो आहे 'भाऊगीत'
देवा ठेवा कानावर हात.

**गायक :–** ( मंद सूर येतात )
चंद्र आहे ऽऽ सूर्य पाहे ऽऽ
सूर्य पाहे ऽऽ चंद्र आहे ऽऽ
रात्र आहे ऽऽ दिवस पाहे ऽऽ
दिवस आहे ऽऽ रात्र पाहे ऽऽ
पुनव आहे ऽऽऽ अवस आहे ऽऽऽ

**चाळकरी ( वैतागून ):—**
त्रास आहे गाण्यानुनि
गाळ वाहे पाण्यानुनि
झोप नाही या चाळीला
'दाद' नाही त्या नरड्याला.
देवा, दुसरी सम गाठा.

**नारद :–** नारायण ! नारायण
दुखु लागला माथा
अंधारातचि उभे गवाक्षी कोण असे भक्ता.

**चाळकरी :–** या चाळीतील मोहन साधा
आणिक साधी सुंदर राधा
परस्परांवर देवा रचती प्रितीचा गाथा.

**नारायण :–** नारायण ! नारायण !

**चाळकरी :–** ऐकू देवा या दोघांचे द्वंदगीत चोरुन.

**मोहन :–** राधिके ! येना ग जवळी.

**राधा :–** सांग कशी रे येऊ मोहना
समोरचे ते बघती नाना
चघळीत आपुली कवळी.

**मोहन :–** सकाळपासून हुरहुरतो मी
वाऱ्यासम भिरभिरतो मी
जिवाची झाली ग होळी.

**राधा :–** काकू वसते वाटेवरती
काका वसती खाटेवरती
तेल घालुनि डोळी.

**मोहन :–** मी राजा अन् तू ग राणी

**राधा :–** भरायचे मज अजुन पाणी
आहे लाविली पाळी.

**मोहन :–** बांधू प्रितीचा ताजमहाल

**राधा :–** परि आडवी येते चाळ
वैरीण दुनिया झाली.

**राधा :–** भेट होईना जवळी असुनी

**मोहन :–** जाऊ दोघे जगा सोडुनी

**दोघे :–** इथे नाही तर मिळेल तेथे प्रीत आपुली खुळी.

* *

**नारद :—** नारायण! नारायण !
भक्ता हे मध्येच आले कोण ?

**चाळकरी :—** कवि आणि कारकून, देवा आले हपिसातून.
परिसा त्यांचे संभाषण.

**कवि :—** तुझी माझी धाव आहे

**कारकून :—** पोटापासून पोटाकडे.
हपिसाच्या फायलीखाली
माझी छाती पिचली होती.










कवि :— रंगविलेली भुक्कड पोर
उगाच मला हसली होती.
कारकून :— साहेबाचे 'स्टेनो'बरोबर
कधी लग्न लागेल काय?
कवि :— पत्रावळीतील उष्टे अन्न
कोण विकत घेईल काय ?
कारकून :— तुझ्या माझ्या पोटावरती
खाणावळीच देतात पाय.
कवि :— खाणावळीच्या भातामध्ये
घासागणिक खडा आहे.
कारकून :— बटाटयाच्या भाजीमध्ये
सुतळीचाहि तोडा आहे.
कवि :— माझ्या ताटी चार खडे
कारकून :— माझ्या ताटी पाच खडे
कवि :— तुझी माझी धाव आहे
कारकून :— पोटापासून पोटाकडे.
कारकून :— ' टायपिस्ट 'च्या तंग झग्याचे
रहस्य कधी उकलेल काय ?
कवि :— छातीवरच्या टोपणाना
वृद्ध तरि फसेल काय ?
कारकून :— वासंतीच्या ओठावरली
कोणासाठी असते लाली
पूर्वी झाले तेच घडे
साहेबानेच दिले जोडे
कवि :— तुझी माझी धाव आहे
कारकून :— पोटापासून पोटाकडे.

* *

नारद :— नारायण! नारायण!
भक्ता ही कसली कुजबूज.
चाळकरी :— पतिपत्नीचे परिसा देवा हळूच ते हितगुज.
पत्नी :— संध्याकाळी भाजी नाही
पीठसुद्धा संपलं आहे
पति :— आज मला भूक नाही
हपिसात थोड खाल्लं आहे
चाळकरी :— उधारीचा पिवळा हत्ती
बायकोपुढे फुंकतो आहे.
पति :— पोटामध्ये आग पडे
पत्नी :— ताणावे किती आतडे
कवि :— तुझी माझी धाव आहे
कारकून :— पोटापासून पोटाकडे.
कवि :— मला आता कळले आहे
द्रौपदीच्या थाळीत बसून
'सत्व' येथून पळाले आहे.
कारकून :— प्रत्येकाच्या पोटावरती
'राईसप्लेट'ची खूण आहे
पति :— जिकडे तिकडे मूल कडे
पत्नी :— मलाहि दिवस गेलेत गडे !

कवि :— त्यात काय नवल गडे
तुझी माझी धाव आहे
कारकून :— पोटापासून पोटाकडे.
नारद :— नारायण! नारायण!
धाव घाली भक्ता आता पाहू नको अंत.
चाळकरी :— चला देवा जाऊ आपण महिलामंडळात.

[ स्थळ :—महिलामंडळ ]

एक महिला :— अय्या! कळलं का ग तुला ?
दुसरी :— इश्श! सांग गडे ना मला.
तिसरी :— अग, आज नवल घडले.
आणि पुरी लागली वाट.
चौथी :— नवलकरांची नलू पळाली धरून कुणाचा हात.
पाचवी :— अय्या! घडायचे ते घडले
येथे नवल काय घडले.
पहिली :— अय्या! कधी घेतलीस साडी.
दुसरी :— 'टॉप' असे रंग!
तिसरी :— चोळी पण मॅचिंग!
चौथी :— अहो वंदनाबाई माझे ऐकाना बाई
पाचवी :— लवकर बोला आहे मजला कामाची घाई.
चौथी :— उसनी साखर तुम्ही घेतली परत करा ना गडे
चहाचे तिच्यावाचूनि अडे.
पाचवी :— उर्मिले! त्रिवार वंदन तुला
साखर घेऊनि नाही म्हणशी काय म्हणावे तुला!
सहावी महिला :—(धावत येऊन)—
भगिनीनो! घात झाला घात !
राधा आणिक मोहन यानी केला आत्मघात.
सात्या जणी :— अगबाई! काय असे घडले!
सहावी :— मोहन आणि राधा यानी विषप्राशन केले
नवल परि जिवंत ते राहिले !
सात्याजणी :— अगबाई! नवलचि हे घडले !
नारद :— खऱ्या प्रीतीच्या पुण्याईने विष अमृत जाहले !
चाळकरी :— नाही देवा ऐका येथे सत्य असे वेगळे.
नारद :— नारायण! नारायण!
करावे सत्याचे कथन.
चाळकरी :— कांद्याच्या चाळीतील आहे मनामनाची व्यथा
नारदा, परिसा परवड कथा.
राधा मोहन यांची प्रीती
परि आडवी आली ज्ञाति
शेवटी विटले ते जगता,
अन्ती निराशेत दारुण
तयानी केले विषप्राशन
परि ते यत्नहि गेले वृथा,
देवा विष ते नव्हते अस्सल
विषात होती नकली भेसळ
जगी धड येईना मरता.
देवा, परिसा परवड कथा.
नारद :— नारायण! नारायण!
हौस पुरली माझी भक्ता तुझी चाळ पाहून
आलो होतो तसाच जातो स्वर्गी मी परतून.
नारायण! नारायण!! नारायण!!!

● ● ●






अनुक्रमणिका

# पळवाट



.....उषा, त्याच्यावरोबर हिंडणं—फिरणं एकदम बंद कर ....
त्या कारकुंड्याशी मी तुला लग्न करू देणार नाही
तात्यांनी उषाला सणसणीत दम भरला....

तात्या बहिरटांची पोस्टात नोकरी करणारी मुलगी एके दिवशी संध्याकाळी घरातून पळून गेली. खरे म्हणजे, ती सकाळी जी ऑफिसात गेली ती परत आलीच नाही. म्हणून ती सकाळीच पळून गेली असे वास्तविक म्हणायला पाहिजे. पण ती सकाळी पळून गेली हे कोणाला कळले नाही. आता तिच्या या पलायनाला साक्षीदार अनेक होते, हे विशेष. शेजारच्या ब्लॉक-मधील पेन्शनर अण्णा दामले तिच्या जायच्या वेळी नेहमीप्रमाणे गॅलरीत उभे होतेच. शिवाय वरच्या मजल्यावरच्या फडणीसांच्या काकूही कचऱ्याचा ढीग बाहेर टाकायला त्याच वेळी गॅलरीत आल्या होत्या. या दोघानाही तिला सूटकेस आणि हँडबॅग हातात घेऊन जाताना पाहिले होते. कोपऱ्यावरच्या चौकातल्या पानवाल्यानेही तिला सूटकेससह रिक्षात वसताना पाहिले होते. नेहमी समोरच्या बस स्टॉपवर त्यावेळी उभी राहताना तो तिला अनेक वर्षे अव्याहत पहात होता. या दिवशी तिला अशी अचानक रिक्षात बसताना पाहून वऱ्याच आश्चर्याने त्याने पिचकारी मारली होती.

मात्र गंमत ही की, तात्या बहिरटांच्या घरातल्या कोणीही तिला जाताना पाहिले नाही. पण त्यात विशेष नवल नव्हते. कारण नेहमीप्रमाणे त्यावेळी घरात कोणीच नव्हते. म्हणजे शांताबाई त्यावेळी ब्लॉक-मध्ये होत्या; पण त्या बाथरूममध्ये गेल्या होत्या. तात्या स्वतः शाळेत गेले होते. सेल्स-टॅक्स इन्स्पेक्टर जगन्नाथ सकाळीच राऊंड-वर रवाना झाला होता. त्याची बायको सुनीता एम्ब्रॉयडरीचे सामान आणायला

म्हणून बाहेर पडली होती, तिचा त्यावेळेपर्यन्त पत्ता नव्हता. राहता राहिला मधू तो तर हातावर पाणी पडताच कॉलेजात पळाला होता. शांताबाईखेरीज त्यावेळी घरात कोणीच नव्हते. रोज जाताना उषा 'गेले ग आई' अशी आरोळी ठोकत होती आणि समोरचे दार आपटून धाड्दिशी लावत होती. हा परिपाठ आता शांताबाईना पाठच झाला होता. शांताबाईना अलिकडे जरा कमी ऐकू येत होते, ही गोष्ट खरी होती. तथापि उषाची आरोळी आणि दार आपटल्याचा आवाज त्याना हमखास ऐकू येत होता. पण त्यादिवशी मात्र त्याना तिची आरोळी व दाराचा आवाज यापैकी काहीच ऐकू आले नाही, हे निश्चित. बाथरूममधून बाहेर आल्यावर उषा ऑफिसात गेल्याचे त्याना जाणवले. त्याच वेळी तिची हाक आणि दाराचा आवाज ऐकू आला नाही, हेही थोडे खटकले. पण त्यानी तिकडे लक्ष दिले नाही. फक्त आताशा फारच कमी ऐकू यायला लागलं, अशी शंका त्याना चाटून गेली एवढंच. सारांश, उषा सकाळीच पळून गेली. इतकेच नव्हे तर चांगली सामानसुमानासह अनेकांच्या बारीक नजरेसमोरून ती चालती झाली. गेली अनेक वर्षे दररोज सकाळी साडेदहा वाजता हातात केवळ नखरेल पर्स खेळवत उषा ऑफिसात जात होती. तेव्हा त्या दिवशी तिच्या हातात सूटकेस आणि हँडबॅग असावी, हे खरे म्हणजे विचित्र होते. पेन्शनर अण्णा आणि फडणीस काकू यानाही ते थोडे अपूर्व वाटले. पण मुख्य म्हणजे तात्या बहिरटांची मुलगी उषा ही घरातून स्वच्छ पळून जाईल अशी शंकासुद्धा कोणालाही येणे शक्य नव्हते आणि आलीच तर ती सहन होणे शक्य नव्हते.

आता उषावरील या जबरदस्त विश्वासाची कारणे अनेक होती. पळून जाणाऱ्या लोकांच्या जमातीत उषा समाविष्ट होऊ शकली नसती. याचे पहिले कारण म्हणजे तिचे वय. उषाचे वय किती होते, हे निश्चित सांगणे कठिण होते. वास्तविक कुठल्याही स्त्रीचे वय निश्चित सांगण्याचा उपद्व्याप करणे जरा अप्रशस्तच. पण उषा ही केसांच्या बटा कुरळ्या करून कपोलावर मिरविणारी कोणी अल्लड तरुणी नव्हती, हे खास. तिच्या कानापासच्या काही बटा तर खुशाल पांढऱ्या दिसू लागल्या होत्या. म्हणून त्या बटांखालचे डोके फिरवून घेऊन ती घरदार सोडून पळून जाईल, हे शक्य नव्हते. दुसरे असे की किमान दहा वर्षे तरी ऑफिसात आणि तेही पोस्टासारख्या सार्वजनिक ठिकाणी नोकरी करीत असल्यामुळे पुरुष हा प्राणी तिला फारसा नवखा राहिला नव्हता. दिवसाकाठी ऑफिसातल्याच नव्हे तर बाहेरच्याही अनेक पुरुषांशी तिचा संबंध येत असल्याने पुरुषजातीबद्दल तिला विशेष नवल राहिले नसले तर ते साहजिकच होते. तेव्हा कुणा पुरुषावर हुरळून ती त्याचा हात धरून पळून जाईल, हे तर असंभाव्य होते. तिसरी सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे तात्या बहिरट, तिचा मोठा भाऊ जगन्नाथ, शांताबाई आणि तिचे इतर सारेच नातेवाईक तिच्या लग्नाचा प्रयत्न करून थकले होते. थकले होते म्हणजे उषाचे लग्न जमत नव्हते म्हणून नव्हे तर उषानेच स्वतः

## राजेंद्र बनहट्टी

आपले लग्न थकविले होते म्हणून. वरसंशोधनासाठी पायपीट करून करून ते थकले नव्हते तर लग्नासाठी उषापुढे हात जोडून जोडून ते थकले होते. इतके की त्यानी अखेर उषापुढे हात टेकले होते, एवढे सांगितले म्हणजे पुरे. जे स्थळ आणावे त्याला उषाचा आपला नकार ठरलेला. उषाला जितके वेळा वास्तविक नकार मिळाला असता तितके वेळा तिने स्थळाना नाकारले होते. या तिच्या नकारघंटेने तात्याही कधी कधी चिरडीला येत असत. तात्या बहिरट हा माणूस, खरे तर, इतका शांत की नाकावरची माशी आत शिरली तरी वारायचा नाही. अगदी मुतासारखा सरळ मनुष्य. जन्मभर मास्तरकी करुनही शाळेतल्या एकही पोरावर त्यानी कधी हात उगारला नाही की एकाही पोराला कोणत्याही परीक्षेत कधी नापास केले नाही. इतकेच नव्हे तर कोऱ्या पेपरालाही पासापुरते मार्क दिल्याबद्दल तात्याना हेड-मास्तरांकडून अनेकदा समजही मिळाली होती. गेली अनेक वर्षे तात्यांच्या पगारवाढीच्या मागणीला एकसारखा नकार मिळत होता. पण त्यानेही ते जितके कातावले नाहीत तितके उषाच्या नकारघंटेने वैतागले होते. त्यांचा काळी पाचमधला आवाज काळी सहात चढलेला सहसा कोणी ऐकला नव्हता. पण उषाचा एखादा नकार फारच झोंबला की रात्री जेवताना तात्यांच्या तोंडात घास फिरू लागे. त्यावेळी समोरच उषा शेवटचा भात संपवीत बसलेली असे. मग तात्यांच्याने राहवत नाही आणि पुढील प्रसंग घडतो :

"अग, त्या फडक्याना कां नाही म्हणतेस तू ?"

उषा ताटात वाटी वाजवते.

"आई, ताक वाढ."

शांताबाई पोळी शेकताहेत. सुनीता उषाला ताक वाढते.

"अग उषा, हे काय विचारताहेत ?"

"मला जेवताना लग्नाच्या गोष्टी करायच्या नाहीत."

"अग, मग केव्हा करायच्या ? माझी तुझी गाठच मुळी जेवायच्या वेळी पडते."

"मला नाही त्या कॉंट्रॅक्टरशी लग्न करायचं. सतत दगड, विटा, चुन्याच्या गोष्टी !"

"अहो, उषाताई, फार पैसे मिळवतात म्हणे हे कॉंट्रॅक्टर लोक आजकाल." सुनीताचा उषाच्या दृष्टीने चोंबडेपणा.

"पैसे मीही मिळवते !"

"अग, मग कोणाशी लग्न करायचं आहे ते तरी सांग."

तात्यांचा आवाज पट्टी सोडतो.

"मी ठरविलं नाही अजून." उषा ताटातले मीठ हाताला फासते. पाणी तोंडाला लावते.

"मग ठरव. केव्हा ठरवणार आहेस तू ?" शांताबाई तात्याना पोळी वाढायला येतात.








"कां ? माझं काय ओझं आहे तुम्हाला ? मी नोकरी करते आहे. माझं मिळवते आहे." उषा उठते. तरातरा हात धुवायला जाते.

तात्याना पोळी वाढणारा शांताबाईंचा हात थबकतो.

"हे काय ? पहिली पोळी अजून तशीच ?"

"असू द्या. आज भूक नाही."

तेवढचात जगन्नाथ हात धुवून येतो. तसा उषा त्याच्या अंगावर टावेल फेकते. हात पुसून जगन्नाथ हसत पानावर बसतो.

"आज उषाताईची तब्येत गरम दिसते."

"अरे, लग्नाबद्दल विचारलं ना ह्यानी आत्ता."

"त्या फडक्यांचीही विकेट उडविली नं हिनं ? लग्न केल्याशिवाय लग्नातला मजा कळायचा नाही." आमटीचा भुरका मारत जगन्नाथ सुनीताकडे तिरपा कटाक्ष टाकतो.

"हो, लग्न करून स्वयंपाकघरात झोपायचा मजा काही औरच." बाहेरच्या खोलीतून उषाचा आवाज येतो.

वरील प्रेमळ हितगुजातला शेवटचा टोमणा अर्थात्च जगन्नाथला असतो. दोन वर्षांपूर्वी लग्न झाल्यापासून जगन्नाथ आणि सुनीता स्वयंपाकघरातच झोपत होती. तेथे झोपणे त्याना भागच होते. नाही म्हणायला, जगन्नाथ स्वयंपाकघराला वैतागून एकदा भांडून घरातून चार दिवस पळून गेला होता. उषा म्हणत होती त्याप्रमाणे तसे तिचे ओझे कोणावर नव्हते, ही गोष्ट खरी. पण तरीही तिची घरात अडचणच होत होती. तीन खोल्यांच्या ब्लॉकमधली एक खोली पहिल्यापासून तिने पटकावली होती. दुसऱ्या बैठकीच्या खोलीत तात्या, शांताबाई आणि मधू झोपत होते. राहता राहिले स्वयंपाक घर. जगन्नाथ आणि सुनीता यांच्या वाट्याला तेथील उंदरांचा खडबडाट आला होता. पुन्हा वर उषा कधीकधी सुनीताला म्हणते कशी–

"काय वहिनी, उंदरांच्या खडबडाटामुळे काल मस्त जागरण झालं असेल ?

"नाही बाई, काल सारे उंदीर झोपले होते विचारे. पलीकडच्या खोलीत एक मांजरी गुरगुरत होती ना ?"

एकूण काय तर लग्नाचा विषय काढला की उषाचे गुरगुरणे थांबत नव्हते. लग्नाला तिचा अशाप्रकारे सक्त विरोध होता. तेव्हा ज्या कारणासाठी बहुतांश मुली घरातून पळून जातात, तो फिल्मी झगडा तिच्या बाबतीत अगदीच अप्रस्तुत होता. परन्तु लग्नाला तिचा नकार असला तरी पुरुषजातीचे तिला वावडे नव्हते, हे विशेष. तशी ती ऑफिसातल्या किंवा इतर ओळखीच्या पुरुषांबरोबर हॉटेलात, बसमध्ये दिसत होती. क्वचित् कोणावरोबर सिनेमा, नाटकालाही जात होती. नाही असे नाही. परंतु ते तेवढ्यापुरतेच. आणि ते तेवढ्यापुरते असल्यामुळेच शांताबाई यांचा जीव आणखीं वर-खाली होत होता. उषाला असे कोणावरोबर हिंडताफिरताना पाहिले की येनेकेनप्रकारेण तिचे लग्न लवकर उरकून टाकायचा तात्या निर्धार करत होते. आणि तात्यांचा निर्धार येनकेनप्रकारेण उषा दर वेळी मोडून काढत होती. असा खेळ चालला होता. पण उषाने लग्नाचा असा लपंडाव मांडला असला तरी ती अशी दिवसाढवळ्या सर्वांच्या समोर हातोहात पळून जाणे शक्य नव्हते. म्हणूनच तिला त्यादिवशी सूटकेस घेऊन रिक्षातून जाताना पाहिले तरी कोणाला तसा संशय आला नाही. कोणाला ती पळून गेल्याचा पत्ताही लागला नाही. आणि तो लवकर लागलाही नसता. पण त्या दिवशी संध्याकाळी सात वाजले, तरी उषाचा पत्ता नव्हता. तरीदेखील शांताबाईना काही संशय येण्याचे कारण नव्हते. गेली असेल कुठे मैत्रिणीकडे किंवा ऑफिसातच उशीर झाला असेल, एवढीच पुसट भावना त्याना झाली असावी. शांताबाई घरात एकटचाच होत्या. तात्या कसलासा समारंभ होता म्हणून शाळेत गेले होते. जेवायलाही त्यादिवशी रात्री घरी येणार नव्हते. मधू नेहमीप्रमाणे परागंदाच होता. पण साडेसातला जगन्नाथ आणि सुनीता बाहेरून परत आली. जगन्नाथ रिपोर्ट लिहायला म्हणून उषाच्या टेबलावर बसला. जांभई देतादेताच टेबलावर पडलेली चिठी त्याने सहज उचलली.

"मी घर सोडून जात आहे. तपास करू नये.– उषा."

जगन्नाथचा हात चुटकी वाजवतानाच थांबला. जांभई मध्येच अडकली आणि तो तसाच ओरडला,

"आईऽऽऽसुनीताऽऽ!"

हाकाहाकीला येथून सुरवात झाली. शांताबाई व सुनीता या बायका तशा दोनच. शिवाय थोड्याबहुत सुशिक्षित व बऱ्याच घरंदाज. पण त्यानी ती तीनमजली इमारत लिलया डोक्यावर घेतली. आणि तीही अल्पावकाशातच. पेन्शनर अण्णा शेजारच्याच ब्लॉकमध्ये राहणारे शिवाय त्यांचे कान नेहमीच बाहेर असत. तेव्हा इमारतीत सर्वात म्हातारे असूनही ते सर्वप्रथम हजर झाले. त्यांच्या पावलावर पाऊल ठेवून फडणीसांच्या काकू. त्यानंतर दुसऱ्या मजल्यावरचे रद्दीवाले कुलकर्णी आणि तिसऱ्या मजल्यावरचे लेखक इनामदार आत आले. भानगड चांगलीच रोमँटिक होती. त्यामुळे सारी इमारत अचानक रोमांचित झाली असल्यास त्यात नवल नव्हते. जेवता जेवता अर्ध्या पानावरून उठूनच बहुतेक जण आले होते. पण ही खमंग लुसलुशीत बातमी ऐकताच त्यांची तहानभूक हरपलीच. बाहेरच्या खोलीत सारेजण जमले. जगन्नाथ जरा आतमध्ये गेला. फडणीसांच्या काकूनी त्याच्या मागोमाग आतमध्ये जायचा मोह कसाबसा आवरला. लगेच पंचनाम्याला सुरवात झाली.

"तरी मी सकाळी तिला सूटकेस घेऊन जाताना पाहिलं!" अण्णा.

"आणि मीही बघितलं." फडणीस काकू.

"अहो, मग तुम्ही सांगायचं नाही का लगेच? कमाल आहे बुवा तुमची! तरी दिवसभर गॅलरीत वर्तमानपत्र वाचत बसता!" रद्दीवाले कुलकर्णी.

अनुक्रमणिका







"अहो, पण मला काय स्वप्न पडलं होतं की ही पळून जाणार आहे म्हणून ?" अण्णा.

"आणि मी म्हणते पळून जाणार हे समजलं असतं तरी कोण तिचा हात धरणार होतं हो ?" फडणीस काकू.

"पण असं सुखासुखी पळून जाण्याचं कारण ?" लेखक इनामदारांनी मुद्याला हात घातला.

"अहो, कारण कसलं आलंय? आजकाल फॅशनच आहे पळून जाण्याची. वर्तमानपत्रं पाहा. रोज किमान पाच तरी मुली पळून जातात. पोलिस कमिशनरानी स्टॅटिस्टिक्सचं दिलं आहे परवाच्या पेपरात. गेल्या वर्षात एकूण १६८७ मुली पळून गेल्याच्या केसेस.

रद्दीवाल्या कुलकर्ण्यांनी अण्णाना मध्येच तोडले.

"अहो, अण्णा तुमच्या १६८७ केसेस राहू द्या बाजूला. या १६८८ व्या केससंबंधी काय ते बोला. दिवसभर नुसती वर्तमानपत्र वाचता हे माहीत आहे आम्हाला!"

"हे पहा कुलकर्णी, आम्ही जर वर्तमानपत्रं वाचली नाहीत तर रद्दी कुठली हो मिळणार तुम्हाला डेपोत ठेवायला?" अण्णा.

"आणि आम्ही जर लेखन केलं नाही तर." इनामदार स्वतःशीच मंद हसले.

"पण मी म्हणतो खरंच काय कारण असावं ?" कुलकर्णी.

"अहो, काऽही कारण नाही, नि काऽही नाही. चांगली नोकरी आहे साडेतीनश्यांची. राहायला घर आहे. केव्हाही कुठेही जायला मुक्तद्वार आहे. आणि पाहिजे काय ?" फडणीस काकू.

दुःखात सुख एवढेच होते की हा सारा परिसंवाद बाहेरच्या खोलीत चालला होता. शांताबाई आणि सुनीता आतल्या उषाच्या खोलीत स्फुंदत होत्या. जगन्नाथ त्यांच्याजवळच उषाच्या सामानात काही शोधाशोध करत होता. मधले पॅसेजचे दार बंद असल्याने बाहेरच्या खोलीतील वाक्प्रचार आतल्या खोलीत प्रकर्षाने जात नव्हते.

"अहो, काकू कारण कसं नाही म्हणता तुम्ही? सारं होतं तिच्याजवळ, पण एक गोष्ट कमी होती. कुलकर्णी.

"कोणती? कोणती गोष्ट?" इनामदार.

"अहो, तिचं लग्न झालं नव्हतं?"

"पण ती म्हणे लग्नच.

जगन्नाथ याच क्षणी आत आला. त्यामुळे अण्णांचं वाक्य अर्धवटच लोंबकळत राहिलं. जगन्नाथभोवती सर्वांनी कोंडाळे केले. सर्वांच्या चेहेऱ्यावर दुःखाचा आनंद ओसंडत होता.

"काय झालं जगन्नाथ ? कसं झालं ?"

"मला तुमच्या इतकंच माहिती आहे.

"आँ, काय म्हणता ?"

"कदाचित् तुमच्यापेक्षाही कमीच माहिती असेल.

"अरे, जगन्नाथ, तुझ्या मदतीला आलोत आम्ही."

"असं ना? मग कुलकर्णी तुम्ही तेवढं शाळेतून तात्याना बोलावून आणा. मी जातो पोलिसात वर्दी द्यायला. इनामदार, तुम्ही येता माझ्याबरोबर ?"

"यायला हरकत नाही. पण, हे पहा जगन्नाथराव, एकदम पूर्ण विचार केल्याशिवाय पोलिसात जाऊ नये, असं आपलं मला वाटतं. उगीच बातमी षटकर्णी होते. वर्तमानपत्रात येते."

"हो, पत्ता लागणं दूरच. पण गावात बोभाटा मात्र होईल.

"आणि ती जाऊन बसली असायची कुठेतरी मैत्रिणीकडे!

"मग तर फजितीच व्हायची.

"बरं, मग कुलकर्णी तुम्ही तेवढं तात्याना

"जातो, पण मी आता जाणार कसा दोन मैल ?"










" माझी सायकल आहे. रिक्षा करा."

" अहो, पण त्याना हर्नियाचा त्रास आहे ना?"

" हर्निया नाही हो, हैड्रोसिल."

" पण जगन्नाथ, मधू कुठे आहे ? त्याला पाठवा."

" हां, ते तर उत्तम."

" मला वाटतं आपण जेवणं करून येऊ या." साऱ्या गोंधळातही इनामदारानी परत मुद्याला हात घातला.

" अहो, जेवणं कसली घेऊन बसलात ? शेजारची मुलगी नाहीशी झाली, रात्रभर झोप येणार नाही आता. काही शेजारधर्म आहे की नाही?" अण्णांचे जेवण संध्याकाळीच आटपले होते.

" पण मला वाटतं वहिरट, तुम्ही पोलिसात लवकर गेलेलं बरं. आजकाल फार झपाट्यानं हालचाली होतात. वसेस्, टॅक्सीज, रेल्वे, विमानं इतकी साधनं आहेत. मनुष्य आज इथे आहे तर उद्या कुठे असेल हे सांगता येत नाही. " कुलकर्ण्यानी समारोप केला.

अखेर जगन्नाथ उठला. आणि त्याने पडदा पाडला.

" मला वाटतं तात्याना येऊ द्यावं. ते आल्यानंतरच काय ते ठरविता येईल."

" हो, हे वरोवर. "

" अगदी, सोळा आणे. "

सगळी मंडळी जायला निघाली तसा मधू शीळ घालत आला. डोक्यावर केसांचे जंगल, उंच हडकुळ्या अंगात किडकिडीत काऊ-बॉय पँट, चट्टेपट्टयांचा तंग वुशशर्ट. कुठल्याशा इंग्रजी सिनेमाहून तो परतत होता हे निश्चित. कारण तोंडातून अद्याप पॉपट्यून्स् बाहेर पडत होते. सिनेमातल्या हीरोचा अंमल अजून उतरला नव्हता. कारण त्याला कुणीतरी बातमी सांगताच तो उद्‌गारला:

" काय ? Now this is something ! "

आता तात्यानी तर वेगळीच गंमत केली. इतके अफलातून रामायण झाल्यावर त्यानी त्याचा खरा कळसाध्याय रचला असेच म्हटले पाहिजे. पहिल्यांदा ते आले तेच मुळी भरपूर उशीर करून चांगले अकरा वाजता. घरात येताच त्याना बातमी कळली. खरे म्हणजे या बातमीने ते हवकून जायचे. मटकन् खालीच बसायचे. पण त्यानी थंडपणे छत्री खुंटीला लावली. टोपी काढून टकलावर सावकाश हात फिरवला. आणि खोलीत जाऊन ते खुर्चीवर बसले. इतके करेपर्यंत त्यांच्या तोंडून फक्त एकच शब्द वाहेर पडला होता.

" केव्हा ? "

तात्यांच्या या तऱ्हेवाईक वागण्याने सारेच वावचळणे साहजिक होते. शांतावाई तर ओरडल्याच.

" अहो, पोरगी कुठे गेली आहे. काय करते आहे. काही तपास कराल का नुसते केव्हा, कुठे करत बसाल खुर्चीवर?"

" मला वाटते पोलिसात रिपोर्ट द्यावा. " जगन्नाथचा चेहराही उतरला होता.

"अरे, पण तिनं तपास करू नका असं स्पष्टं लिहिलं आहे ना?"

आता मात्र तात्यांची हद्द झाली. जगन्नाथ मटकन् खुर्चीवर बसला. सुनीता दाराला टेकली. मधू टीपॉयवर तर शांतावाईंनी एकदम खालीच बसकण मारली. काही क्षणांच्या शांततेनंतर शांतावाईंचा रडवेला आवाज उमटला,

" देवा, काय माझ्या नशिवात आहे तूच जाणे! तिकडे पोरगी पळून गेली नि इकडे ह्याना वेड लागलं. पोटची पोर गेली . . . जीवाला घोर लागला आहे आणि ह्यांचं डोकं फिरलं."

" हे पहा, माझं डोकं अजून ठिकाणावर आहे. निदान तू समजतेस तितकं फिरलेलं नाही. दुसरं असं की उषा शहाणी आहे, सुशिक्षित आहे. ती वेड्यासारखं काही करणार नाही. माझा तिच्यावर विश्वास आहे." तात्यानी समोर पडलेलं वर्तमानपत्र उचलून चक्क वाचायला सुरवात केली. पुन्हा सर्वजण शुद्धीवर यायच्या आतच ते मोठ्यांदा वाचल्यासारखं वोलले. वर्तमानपत्र चेहऱ्यासमोरून दूर न करताच.

" हे पहा जगन्नाथ, आजपासून उषाची खोली तुझी. मधू, तुला उषाचं ड्रेसिंग टेवल पाहिजे आहे ना? ते आजपासून तुझं. सुनवाई, उषा तुम्हाला सुईंग मशीन वापरू देत नव्हती ना? आजपासून ते तुमच्या हवाली."

सारे चकार शब्द न वोलता आ वासून तात्यांकडे पाहत राहिले. तात्यांकडे म्हणजे त्यांच्या चेहऱ्यासमोरच्या वर्तमानपत्राकडेच. कारण त्यांचा चेहरा दिसतच नव्हता. शांतावाईंनी मात्र कपाळावर हात मारून घेतला.

" अहो, आता पोरीचा काही शोध लावणार आहात की तिच्या सामानाची विल्हेवाट लावत वसणार आहात? जीवाला काहीच कसं वाटत नाही, अगदी सुखात वर्तमानपत्र वाचणं चाललंय?"

तात्यानी चेहऱ्यासमोरचे वर्तमानपत्र दूर सारले. पण त्यापूर्वीच त्यानी रुमालाने डोळे कोरडे केले होते. सर्वांकडे एकवार पहात तात्यानी तोंड उघडले.

" आता शेवटी एक लहानशी वातमी सांगतो."

साऱ्याना वाटले तात्या नुकत्याच वाचत असलेल्या वर्तमानपत्रातील वातमी सांगणार आहेत. म्हणून सर्वांना जवळजवळ घेरीच आली. पण तेवढ्यात तात्यांचे शब्द आले,

" उषा कुठे गेली असेल, हे मला माहिती आहे."

" काय? " हा शब्द नुसता ऐकू आल्यासारखा वाटला. पण खरे म्हणजे कोणाच्याच तोंडातून तो धड उमटला नव्हता. प्रत्येकाला वाटले तो दुसऱ्याने उच्चारला. मात्र सारे ताडकन् उठून उभे राहिले. मधूने खास फिल्मी शीळ घातली. रहस्यमय चित्रपटात रात्रीच्या प्रसंगात उमटते तशी.

" म्हणजे उषा कुठे गेली असावी, याची कल्पना मला आहे. उद्या सकाळी जाऊन चौकशी करीन. मग नक्की सांगेन. तोपर्यंत पोलिसाना चार हात दूर ठेवा. आणि आता स्वस्थ चित्तानं झोपा."

तात्या उठलेच. त्यानी कोट काढला. शांतावाईंकडे वळून फक्त ते म्हणाले, " आणि तुला एकच विनंती. आज आता मला









अनुक्रमणिका

कुठलाही प्रश्न विचारायचा नाही. एकदम झोपायचे. हे मंजूर असेल तरच इथे झोप. नाहीतर आपली पथारी स्वयंपाकघरात टाक. उपा जशी तुझी मुलगी आहे तशीच माझीही आहे. मधू, अरे चल माझा बिछाना टाक आणि दिवा मालव."

तात्यानी कपडे काढले आणि ते बिछान्यावर आडवे होऊन निवांत घोरू लागले. तात्यांच्या या अनोख्या अवताराने स्तिमित झालेले ते सारे कुटुंबही हळुहळू आपापल्या स्थानी निद्राधीन झाले. पण खरे म्हणजे तात्यांसह खरी झोप कुणालाच येणे शक्य नव्हते. निदान त्या रात्री तरी.

दुसरा दिवस अर्थातच भलताच आणीबाणीचा निघाला. जगन्नाथ साहजिकच राऊंडवर गेला नाही. पण सुनीता कुठल्याही क्लासला गेली नाही, हे विशेष. शांताबाई स्वयंपाकात साखरेऐवजी मीठ टाकू लागल्या तेव्हा त्याना स्वयंपाकाची झाकपाक करणे भागच पडले. आश्चर्य म्हणजे मधू त्या दिवशी सकाळी अव्याहत घरी होता. हॉटेलात जाऊन जेवण्यासाठी जगन्नाथने पैसे दिले तरी तो कॉलेजला बुट्टी मारून घरीच राहिला. अर्थात् जेवणाच्या पैशांचा तो दुपारच्या मॅटिनीसाठी सदुपयोग करणार होता, हे ओघानेच आले. परिस्थिती गंभीर होती. सकाळ होताच तात्या घराबाहेर पसार झाले, ते एखाद्या सी. आय. डी.च्या सफाईने. चहाचा कप खाली ठेवताच त्यानी कपडे चढवले. जगन्नाथने बरोबर येण्याबद्दल विचारताच त्यानी हातानेच नकार दिला. आणि ते अलगद बाहेर पडले. तथापि तात्या गेल्यावर अण्णा चार वेळा डोकावून गेले. कुलकर्णी तीन वेळा विचारून डेपोत रवाना झाले. इनामदार जाताना एकदा चौकशी करून गेले. घरातल्या लोकानाही फक्त एकच उद्योग उरला. तो म्हणजे घरातून गॅलरीत फेऱ्या मारण्याचा. जगन्नाथने किमान पन्नास तरी फेऱ्या मारल्या असतील. सुनीता अदमासे तीस फेऱ्या मारून तांदूळ निवडीत बसली. मधू फक्त दहा फेऱ्यांपर्यंत पोचला. शांताबाईंनी तर फक्त एकच चक्कर केली. तशी अर्धीच. कारण त्या ज्या एकदा गॅलरीत गेल्या त्या तेथेच दाराशी बैठक मारून बसल्या. तात्यांच्या वाटेकडे डोळे लावून.

आदल्या रात्री झोप नव्हती. शिवाय वाट पाहून पाहून डोळे अखेर जड झाले. म्हणून सगळयानाच गुंगी यायला लागली. टीपॉयवर पाय पसरून जगन्नाथ खुर्चीवर झोपला. सुनीता तांदळाच्या ताटावरच पेंगू लागली. शांताबाईंनी गॅलरीच्या दारावर डुलकी घेतली. मग केव्हातरी एकदम मधू ओरडला, "तात्या आले." त्याबरोबर जगन्नाथ झोपला होता तो धडपडत उठला आणि त्याने लाथेने टीपॉयवरचे फ्लॉवरपाट उडविले. सुनीताच्या हातातले तांदळाचे ताट खाली आपटले. शांताबाईंनी गडबडून उठता उठता दाराचा पडदा खाली आणला. सर्वांची चलबिचल होऊन असे बरेचसे उध्वस्त चित्र निर्माण झाले असतानाच त्यात तात्यानी प्रवेश केला.

नेहमीप्रमाणे छत्री अडकवून, टोपी काढून टकलावरचा घाम रुमालाने पुसल्यावर मगच तात्या खुर्चीवर टेकले. चकार शब्दही न



## व्यथा

गीत दे बदलो तुला मी, तू दिली मजला व्यथा,
या व्यथेच्या पार व्हाया दान दे अश्रू अता
संपल्या त्या डोळभेटी हासु गहिरे संपले
संपला सहवास वेडा . . . स्वप्न अधुरे भंगले
पाखरू कैसे टिकावे वादळे झोपावता
या व्यथेच्या पार व्हाया दान दे अश्रू आता—१

सूचना केल्यावरी तू मी मुका राहू कसा
दोषही दैवावरी का ? दाटुनी येतो घसा
खेळ तू खेळून जाशी, जिंकिशी तू, मी रिता
या व्यथेच्या पार व्हाया दान दे अश्रू अता—२

वंचिताला फक्त ठावे वंचनेच्या वेदना
अग्निच्या का अंतरीची पुष्प जाणे यातना
घेवुनी सर्वस्व माझे घाल ही भिक्षा हता
या व्यथेच्या पार व्हाया दान दे अश्रू अता—३

— सौ. कमल जोशी

बोलता कोटाच्या खिशातून एक चिटोरा काढून त्यानी समोर झुलणाऱ्या जगन्नाथच्या हातात दिला. त्याने तो भिरभिरत्या नजरेने वाचला. त्यावर कुणातरी माणसाचा नाव व पत्ता होता, एवढेच त्याला कळले. त्याने तो शांताबाईना दिला, नंतर सुनीताने वाचला. नंतर मधूने. तात्याना म्हातारचळ लागला की काय अशा भीतीने सारेच क्षणभर गप्प राहिले. नंतर शांताबाईना वाचा फुटली,

"हे चिटोरं कसलं? हा पत्ता कुणाचा?"

"तुझ्या जावयाचा !

"जावयाचा ? हा शब्द मुळात कोणी उच्चारला हे सांगता येणे कठिण आहे. पण तो उमटताच त्याचे अनेक प्रतिध्वनी उठले. कारण त्यात शांताबाई, जगन्नाथ, सुनीता, मधू या चौघांचेही आवाज समाविष्ट होते.

"अहो, काय बोलताय काय तुम्ही ? " हा मात्र शांताबाईंचाच आवाज.

"तुमच्या मुलीनं लग्न केलं. तिच्या नवऱ्याचा हा पत्ता आहे." तात्यांचे गोळीबंद उत्तर.








"लग्न ? " या शब्दाचेही परत अनेक प्रतिध्वनी. पाण्यात दगड मारताच वलये उठतात तसे.

"तिनं पळून जाऊन लग्न केलं. काल दुपारी."

"पळून जाऊन ? पण तिला कोणी मनाई केली होती का लग्नाची?" परत शांताबाईंचाच आवाज. पण तो ओळखू न येण्याइतका फाटला होता.

"केली होती."

"कोणी ?"

"मी केली होती."

"तुम्ही ?" टकलावर हात फिरवीत खुर्चीवर बसलेली तात्यांची मूर्ती चौघानाही दुभंगल्यासारखी वाटली. प्रत्येकाला चार याप्रमाणे एकूण सोळा तात्या त्या चौघाना मिळून खोलीत दिसू लागले. पण ते अलौकिक दृश्य पाहण्याचे सुख त्याना फार वेळ लाभले नाही. लगेचच त्यांची डोकी गरगरायची थांबली. आणि परत एकच तात्या उरले.

"अहो, काय झालं नीट सांगा तरी !

"सांगतो. तुम्ही असे अंगावर येऊ नका. स्वस्थ जागेवर वसा."

सर्वांनी भराभर आसने पटकावली. पण सारे पुढे वाकलेच. बोलणे बंद केले तरी साऱ्यांची तोंडे उघडलेलीच राहिली.

"चार पाच दिवसांपूर्वी उषा मला एका माणसाबरोबर भेळ खात उभी असलेली दिसली. तो माणूस गेल्यावर मी तिला गाठले. विचारले, "कोण होता तो? त्याच्याबरोबर कां हिंडते आहेस ?" माझा आवाज कधी नव्हे तो चढलेला पाहून ती चपापली. पण दवली नाही. "त्यांचे माझ्यावर प्रेम आहे. डी. ए. जी. च्या ऑफिसात हेडक्लार्क आहेत." मी लगेच तिला सुनावले, "हे पहा उषा, तू त्याच्यावरोबर हिंडणं बंद कर. त्या कारकुंड्याशी मी तुला लग्न करू देणार नाही." ती किंचाळलीच "काय?" तसे मी तिला चापले, "तुझ्यासाठी पायपीट करून आणलेली अनेक चांगली स्थळे तू लाथाडलीस. आता या फडतूस माणसावरोवर मी तुला लग्न करू देणार नाही." त्यावर ती म्हणाली, "माझी मी स्वतंत्र आहे. मेजर आहे. पाहिजे त्याच्याशी लग्न करीन किंवा न करीन." "पाहतोच कशी लग्न करतेस ते. तुझे फार लाड केले आम्ही याचा अर्थ वाटेल त्याचा हात धरून तू जाऊ शकतेस असा नाही. मी तुझा वाप आहे. माझे तुला ऐकलेच पाहिजे. लग्न करणं म्हणजे पोस्टाची तिकीटं विकणं नव्हे." "ठिक आहे. पाहाच तुम्ही. एका आठवड्यात मी यांच्याशी नाही लग्न केलं तर. झालं !" अशा प्रकारे आमची झटापट झाली. काल दुपारी उषाने रणांगणातून पळ काढला आणि या चिटोऱ्यातल्या गृहस्थाशी लग्न करून लढाई जिंकली. तात्यानी टाळी वाजवून वरील सुरस आणि चमत्कारिक भाषण संपविले. इतर सारेच क्षणभर स्तब्ध राहिले. मग साऱ्यांची तोंडे मिटली. आणि बोलण्यासाठी पुन्हा उघडली.

"अहो, पण तिच्या लग्नाला विरोध कां केलात तुम्ही ?" शांताबाई.

"अग, किती वेडी तू ? मी विरोध केला नसता तर हे लग्न झालं नसतं. या जन्मात तिनं लग्न केलं नसतं." तात्या.

"पण जातपात पाहिलीत का जावयाची ? कसा माणूस आहे, काय आहे ?"

"सारी चौकशी केली आहे मी गेल्या चार दिवसात. जात चांगली आहे, पात चांगली आहे. आता माणूस फार सज्जन नसला तरी आपल्याइतका सज्जन आहे." यावर मधूच मोठचांदा खिकाळला.

"ए मध्या, उगीच हसू नकोस. पण मी म्हणत्ये, पोरीचं लग्न कसं थाटामाटानं करायचं ठरवलं होतं. ही काय पद्धत झाली लग्नाची?" शांताबाईंचे आक्षेप काही संपत नव्हते.

"अग, काल लग्न करून ते पळाले आहेत माथेरानला. हनीमूनसाठी. तेथून परत आले की त्याना बोलावू. मग करा काय थाटमाट करायचा तो." तात्यांचे उत्तरही तयार होते.

"पण पळून जाऊन लग्न करायचं म्हणजे जरा. जगन्नाथने प्रथमच तोंड उघडले. पण तात्यानी त्याला मध्येच कापले.

"अरे, लग्न केल्यानंतर पळून जाण्यापेक्षा पळून जाऊन लग्न केलेलं वरं."

"मी पळून गेलो नव्हतो. चार दिवस मित्राकडे राहायला गेलो होतो." जगन्नाथ सात्विक संतापाने उत्तरला.

"आणि मी म्हणतो पळून जाऊन लग्न केलं म्हणून काय विघडलं? आपल्या पुराणात, इतिहासात काय कमी उदाहरणं आहेत? रुक्मिणीनं काय केलं? संयोगितेनं काय केलं? त्याना नाही नावं ठेवत तुम्ही ? त्यानी पळून जाऊन. "

"तात्या, हा इतिहासाचा तास नाही. इथे समाजाचा, अब्रूचा प्रश्न आहे." जगन्नाथने मध्येच अडसर लावला.

"तुमची पुराणातली वांगी राहू द्या पुराणात. उषा आपली पोटची मुलगी. . " शांताबाई पुढे बोलणार तोच तात्या उठले. त्यानी कोट उतरवला.

"अग, पोटची मुलगी म्हणूनच लग्न उरकून टाकलं तिचं. ती काही केल्या लग्न करीत नव्हती म्हणूनच मी ही पळवाट काढली. ना? चल, माझ्या तिसऱ्या तासाची वेळ झाली. पहिले दोन तास वुडविले तुझ्या मुलीनं आमचे. मला जेवायला वाढ. सुनवाई, चला पानं घ्या." सांडलेले तांदूळ गोळा करणारी सुनीता उठून आत गेली.

मधू मघापासून कोपऱ्यात उभा राहून सारा सिनेमा पाहत होता. तो अखेर पुढे झाला.

"तात्या, तुम्ही ताईच्या लग्नात मला नवीन सूट करणार होता. आता लग्न झालं नाही तरी मला मात्र सूट पाहिजे."

"अरे, लग्न झालं आहे वेडचा, झालं आहे. तुला सूट मिळेल. इतकंच काय पण वूटही मिळेल. चल, ती फुलं पडली आहेत. इकडे तिकडे ती उचल. नीट फ्लॉवरपॉटमध्ये लाव. तो पडदा खाली पडला आहे तो वर लाव." तात्यानी आत जाता जाता मधूच्या डोक्यावर चापटी दिली. बऱ्याच वर्षांनी तात्यांची अशी लाडिक चापटी वसल्याने मधू चेकाळलाच. घरातलं एकही काम कधी न करणारा मधू कधी नव्हे तो पँटची इस्त्री चिमटीत धरून खाली बसला. एक फर्मास शीळ घालत कागदाची फुले उचलून फ्लॉवरपॉटमध्ये लावू लागला. तोच वेल वाजली. मधूने दार उघडले तो पेन्शनर अण्णा समोर उभे.

"अरे, उषाचं काय झालं ?"

"उषाचं लग्न झालं."

मधून धाड्दिशी दार लावले.








# यानंतर मला पुन्हा मूल केव्हा व्हावे

बालकाच्या विकासाच्या दृष्टीने त्याच्या जीवनातील पहिल्या चार पाच वर्षांचा काळ फार महत्त्वाचा असतो असं डॉक्टर्स सांगतात. मातेच्या आरोग्याच्या दृष्टीनेही, पहिल्या अपत्याच्या पाठीवर तिला निदान तीन-चार वर्षांनंतरच पुन्हा मूल होणे इष्ट असते.

संतती नियमनाच्या अनेक साध्या व परिणामकारी पद्धती आजमितीस उपलब्ध आहेत. आता अपत्यजन्म ही योगायोगाची अथवा नशिबाची गोष्ट राहिलेली नाहीं. पाहिजे तेव्हाच आपणांस अपत्य होऊ देणे आता तुमच्या हातचे आहे.

मोफत सल्ला व सहाय यांच्यांसाठी नजीकच्या कुटुंब नियोजन केंद्रात विचारणा करा.

**आणि लक्षात ठेवा :**


दोन वा तीन मुले पुरेत.



davp 68/2[illegible]

**श्री. श्री. ज. जोशी यानी लिहिलेल्या 'आनंदी गोपाळ' या चरित्रात्मक कादंबरीवर झालेल्या चर्चेच्या वेळी प्रा. म. वा. धोंड यानी कादंबरीबाबत काही आक्षेप घेऊन टीका केली होती. त्या संदर्भात त्यांच्यावर 'मराठी कादंबरीच्या मार्गातील धोंड' अशी कुत्सित प्रतिटीकाही झाली. प्रा. धोंड यानी या लेखात सदर कादंबरीचे परखड परीक्षण करून आपल्यावरील प्रतिटीकेला सणसणीत उत्तर दिले आहे.**





# आनंदी गोपाळ



प्रा. म. वा. धोंड

श्री. श्री.ज.जोशी यांची 'आनंदी गोपाळ' ही कादंबरी हल्ली फार गाजते आहे. 'ही कादंबरी एकदा वाचायला घेतली की संपविल्याशिवाय खाली ठेववत नाही', 'ही यंदाची सर्वोत्कृष्ट कादंबरी', 'ही कादंबरी महाराष्ट्रात घरोघर वाचली जावी', 'श्री. ज. जोशी यांच्या प्रतिभेने नवी झेप घेतली आहे,' इत्यादी शब्दात या कादंबरीचा सर्वत्र गौरव होत आहे. या सर्व अभिप्रायांशी मीही सहमत आहे.

परंतु (१) चरित्रात्मक कादंबरी म्हणून ही कादंबरी यशस्वी झाली आहे काय ? आणि (२) ही एक श्रेष्ठ कादंबरी आहे काय ? या दोन्ही प्रश्नाना ठाम 'नाही' असेच माझे उत्तर आहे.

वरील दोन प्रश्नांचा क्रमाने विचार करू.

चरित्रात्मक कादंबरी हे चरित्र आणि कादंबरी यांचे एक चमत्कारिक मिश्रण असते. कादंबरी ही एक संपूर्णपणे कल्पित कथा म्हणूनच वाचायची असते. त्यात आपण समाजातील खऱ्याखुऱ्या व्यक्ती पाहायचा प्रयत्न केला तर तिच्या आस्वादात व्यत्यय येतो. उलट चरित्रात संपूर्ण सत्याचीच अपेक्षा असते. त्यातील व्यक्ती वा घटना खऱ्या नसल्याची नुसती शंका आली, तरीही चरित्रवाचनात विक्षेप उत्पन्न होतो. या परस्परविरोधी अपेक्षांची तडजोड कशी करायची ? या बाबतीत तडजोड संभवते ती हीच की, कादंबरीकाराने चरित्रविषयिभूत व्यक्तींच्या जीवनातील ज्ञात घटनांचा जराही विपर्यास न करता कल्पनेच्या साह्याने त्यात रंग भरावा. त्यासाठी त्या सत्य घटनाना कल्पित प्रसंगांची वा पात्रांची जोड द्यावयाला हरकत नाही; मात्र ते कल्पित प्रसंग वा ती कल्पित पात्रे सत्याशी विसंगत वाटणार नाही, एवढी सावधानता राखणे आवश्यक आहे. सत्याची एवढी बूज राखली की त्या सत्य व कल्पित प्रसंगांतून व पात्रांतून कादंबरीकार चरित्रविषयिभूत व्यक्तीची जी प्रतिमा निर्माण करतो ती त्याची स्वतंत्र निर्मिती. या प्रतिमेच्या बाबतीत सत्यासत्याचा प्रश्न उद्भवतच नाही, कारण कोणत्याही व्यक्तीची दुसऱ्याच्या इतरांच्या मनात जी प्रतिमा उमटते ती नेहमीच कल्पित असते.

## पूर्वतयारी अगदीच तुटपुंजी

चरित्रविषयिभूत व्यक्तीच्या जीवनातील घटना समजून घेण्याकरिता प्रचंड उद्योगाची आवश्यकता आहे. डॉ. आनंदीबाई जोशी व गोपाळराव जोशी यांचा काल म्हणजे ८०–९० वर्षांपूर्वीचा काल. त्यांचे जीवन प्रत्यक्ष पाहिलेल्या व्यक्ती आज हयात नाहीत की खुद्द त्यांचे वंशजही हयात नाहीत. त्यामुळे त्यांच्या जीवनाचा शोध घेण्याची साधने म्हणजे काशीताई कानिटकरानी लिहिलेले आनंदीबाईंचे चरित्र आणि आनंदीबाई व गोपाळराव यांच्यासंबंधी माहिती असलेली इतर पुस्तके व तत्कालीन नियतकालिके. श्री. श्री. ज. जोशी यानी आनंदीबाई व गोपाळराव यांची माहिती मिळविली ती मुख्यतः काशीताई कानिटकरांच्या ग्रंथावरून. केळकरांचे 'टिळकचरित्र,' देवगिरीकरांचे 'वासुकाका जोशी व त्यांचा काळ,' कुलकर्णी यांचे 'मामा परमानंद' या ग्रंथावरून त्या माहितीत भर घातली. या ग्रंथांव्यतिरिक्त 'शतपत्रे' व 'रानडे चरित्र' या ग्रंथांचे त्यांनी वाचन केले, ते तत्कालीन सुधारणावाद कळून घेण्याकरिता आणि 'स्मृतिचित्रे' व 'पंडिता रमाबाईंचे चरित्र' हे ग्रंथ वाचले, ते ख्रिश्चन धर्म व धर्मांतरितांविषयी माहिती मिळविण्याकरिता. कादंबरीत 'सुबोधपत्रिके'तले उतारे आले आहेत. तेही वरील








'मामा परमानंद' या ग्रंथावरूनच. * शकुंतला परांजपे यांनी त्याना गोपाळरावांच्या काही गमती व ते कसे दिसत असत ते सांगितले, असे ते प्रस्तावनेत लिहितात. परंतु गोपाळरावांसंबंधीच्या शकुंतलाबाईंच्या आठवणी त्यांच्या बालपणातील व गोपाळरावांच्या वृद्धापकाळातील. सारांश कादंबरीकाराची पूर्वतयारी अगदीच मामुली दिसते. शिवाय ही पुस्तकेही त्यांनी नीट वाचलेली दिसत नाहीत. कशी ते पुढील विवेचनावरून कळून येईलच.

याप्रमाणे कादंबरीकाराची पूर्वतयारी अगदीच तुटपुंजी असली, तरी त्याची जाण त्याला असलेली दिसत नाही. तिची भरपाई आपण केवळ कल्पनेच्या साह्याने करू शकू, अशी त्याची हिम्मत दिसते. काशीताईंच्या चरित्रातील त्रोटक प्रसंग—क्वचित एखाद-दुसऱ्या वाक्यात उरकलेले—श्री. जोशी यांनी आपल्या कल्पनेचे रंग भरून जिवंत केले आहेत. यमूच्या लग्नाची खटपट, गोपाळरावांनी तिला पाहायला येणे, आनंदीबाईंनी अमेरिकेत दिलेली भारतीय थाटाची मेजवानी, तिचा कार्पेंटरबाईंच्या घरचा सागरगोटयांचा खेळ, आनंदीबाईची ग्रीनवुडकंट्रीची सहल, वगैरे प्रसंग मुळातीलच, पण श्री. जोशी यांनी सरस वर्णिले आहेत. पुनर्विवाहाकरिता गोपाळरावांनी घेतलेली पंडितांची भेट, विवाहानंतरच्या सुरुवातीच्या दिवसात गोपाळरावांनी आनंदीच्या ठिकाणी निर्माण केलेली शिक्षणाची आवड, कोल्हापुरात झालेली जाधवरावांची भेट इत्यादी प्रसंग तर संपूर्णपणे कल्पितच, पण तेही अतिशय सरस व चरित्राला पोषक असेच उतरले आहेत.

## रंगवण्यासारखा प्रसंग

आनंदी वयात आल्यानंतर गोपाळराव व ती यांच्या लैंगिक जीवनासंबंधी जे प्रसंग कादंबरीकाराने रंगविले आहेत ते ओंगळ वाटतात, असा आक्षेप अनेकांनी घेतला आहे, परंतु त्यांनाही "चवदाव्या वर्षी अमलात आणिलेले नाना प्रकार, हे सर्व त्या-त्या वयाच्या, शरीराच्या व मनाच्या मानाने अतीच कडक होते." (चरित्र पृ. २४४–४५) या आनंदीबाईच्या पत्रातील वाक्याचा आधार आहे. आनंदीचा पोरपणा आणि ज्ञातास्वाद विजवर गोपाळरावाचा अधिरेपणा व पाशवी वृत्ती यांचे हे चित्रण आहे. एवढा उत्तान नसला तरी आनंदीचा पोरपणा व गोपाळरावांचा अधिरेपणा दाखविणारा एक प्रसंग काशीताईंच्या चरित्रात आलेला आहे, तो त्यांच्याच शब्दात देतो —

"आनंदीबाईला अलीबागेस असता ऋतु प्राप्त झाला. त्यावेळी हिंदु चालीप्रमाणे जे सोहळे व्हावयाचे तसे झाले. ऋतुशांतीसाठी व मुलाची फार दिवसात भेट झाली नाही म्हणून, गोपाळरावांची आई अलीबागेस आली. आनंदीबाईच्या तिसऱ्या दिवशी, गोपाळराव इकडे तिकडे कोणी नाही असे पाहून, मखराजवळ जाऊन बसले, व बायकोला थट्टेने म्हणाले— "काय, तुझी तर बोवा चैन आहे आता दोन दिवस! कसे सुंदर मखर घातले आहे! किती अंगावर दागिने लटकावले आहेत! चांदीची भांडीन् बिडीन् मोठा थाट केला आहे बोवा! आणखी, त्यामुळे तू किती सुंदर दिसते आहेस म्हणून सांगू!!" असे म्हणून तिला त्यांनी हात लाविला. त्यासरशी 'अगबाई! बिटाळ झाला ना?' असे म्हणून आनंदीबाई ओरडली. हे शब्द आजीने ऐकिले व ती माडीवर आली. आनंदीबाईंनी आजीजवळ सर्व हकीकत सांगितली. इतक्यात गोपाळरावांनी 'ही सांगते हे सर्व खोटे आहे' असे सांगितले व तेथे असलेल्या बिछायतीवरून ते दुसऱ्या खोलीत चालते झाले. हे सर्व पाहून आजीच्या जीवाचा संताप झाला. ती म्हणू लागली, 'मी आताच्या आता कल्याणाकडे निघून जाते. मला असला भ्रष्टाकार मुळीच खपावयाचा नाही हा सर्व प्रकार गोपाळराव दुरून पहात होते. त्यांनी तिला, 'पाहिजे असेल तर जा' म्हणून सांगितले. त्या दिवशी ती म्हातारी जेवली नाही. दुसऱ्या दिवशी तिने आपणच होऊन चिरगुटे पांघुरणे धुतली व नंतर सैपाक वगैरे करून जेवली. हा सर्व गोंधळ व चमत्कार गोपाळरावांची आई पहात होती. ती बिचारी एक शब्दही बोलली नाही. उलटे आजीचे आर्जव करून तिला रहावून घेतली. (चरित्र पृ. ३०–३१)

श्री. जोशी यांनी हा प्रसंग कादंबरीत कां घेतला नाही? आनंदी, गोपाळराव, आनंदीची आजी व गोपाळरावांची आई या सर्वांचा स्वभाव आणि तत्कालीन ऋतुशांतीचा सोहळा यांचे उत्कृष्ट दर्शन या प्रसंगात होते. परंतु हा प्रसंग काहीसा असभ्य वाटूनच की काय मनोरंजनाने प्रसिद्ध केलेल्या चरित्राच्या दुसऱ्या आवृत्तीत गाळला आहे. श्री. जोशी यांनी ही दुसरी आवृत्तीच वाचलेली दिसते; नाही तर त्यांनी हा प्रसंग नक्कीच रंगवला असता.†

---

* 'गाढव-गाढवीच्या विवाहाची निमंत्रणपत्रिका मला देवगिरीकरांच्या पुस्तकात मिळाली,' असे श्री. जोशी प्रस्तावनेत लिहितात. त्या पुस्तकात विवाहासंबंधी अवाक्षरही नाही. या विवाहात वासुकाकांकडे व्याहयाची भूमिका होती. चरित्रनायकास त्यामुळे उणेपणा येतो, या समजुतीने देवगिरीकरांनी त्या प्रसंगाचा उल्लेखही टाळला आहे.

† ठाण्याहून अलिबागेस गोपाळरावांची बदली झाल्यावर आनंदीस ऋतु प्राप्त झाला, हे काशीताईंच्या चरित्रावरून स्पष्ट आहे. परंतु कादंबरीकाराने त्या आधी आनंदी कल्याणास असतानाच तिला ऋतुस्नात करून तिचे गर्भाधान उरकून टाकले आहे. ही विसंगती लक्षात घेऊन साहित्यसंघात झालेल्या एका परिसंवादात प्रा. य. दि. फडके यांनी, 'आनंदीच्या ऋतुप्राप्तीकरिता गोपाळरावापेक्षा कादंबरीकारच जास्त अधीर झालेला दिसतोय!' असा शेरा मारला होता. कादंबरीकाराचा अधिरेपणा खरा, पण आनंदीच्या ऋतुप्राप्तीच्या बाबतीत नव्हे, तर कादंबरी लिहिण्याचा. काशीताईंच्या चरित्राची पहिली आवृत्ती तरी पहावी, एवढा धीर त्यांना कुठला!






आनंदीबाईच्या व गोपाळरावांच्या जीवनात घडलेल्या आणि न घडलेल्या पण त्यांच्या जीवनांशी सुसंगत असलेल्या अशा कल्पित प्रसंगात श्री. जोशी यांनी जे रंग भरले आहेत, त्यांनी तेवढचा प्रमाणात या दोघांचे चित्रण जिवंत व आकर्षक बनले आहे, यात शंका नाही. परंतु वर उल्लेखिलेल्या प्रसंगचित्रणात त्यांनी जे सत्याशी इमान राखले आहे ते इतरत्र राखलेले दिसत नाही. या कादंबरीतील (१) कित्येक प्रसंग चुकीच्या माहितीवर आधारलेले आहेत, (२) कित्येक प्रसंगात कालविपर्यास आहे, (३) कित्येक प्रसंग तत्कालीन परिस्थितीशी विसंगत आहेत आणि (४) आनंदीबाई व गोपाळराव यांचे स्वभावचित्रण सत्याशी विसंगत आहे. क्रमाने उदाहरणेच देतो :

(१) आनंदीबाईच्या अखेरच्या दिवसात तिला त्या काळचे प्रख्यात भिषग्वर बापूसाहेब मेहेंदळे यांचा औषधोपचार लाभावा म्हणून गोपाळराव व बाळशास्त्री माटे हे त्यांच्याकडे जातात असा प्रसंग ३० व्या प्रकरणात चित्रित केलेला आहे. मेहेंदळे औषधोपचार करण्याचे नाकारतात एवढेच नव्हे तर, 'बाळ, माझा तुला शाप आहे ...मी दिलेली विद्या जर तू या बाईच्या कारणी लावलीस तर ती निष्फळ होईल' असा बाळशास्त्र्यांना शाप देतात, असा या प्रसंगाचा शेवट केला आहे. वास्तविक पहाता मेहेंदळे हे बाळशास्त्र्यांचे गुरू नव्हते तर शिष्य होते. मामा परमानंदांच्या चरित्रात गोपाळरावांचे एक पत्र दिले आहे, त्यावरून हे स्पष्ट होते * ते पत्र नीट न वाचल्यामुळे श्री. जोशी यांच्या डोक्यात काही गोंधळ झालेला दिसतो. बाळशास्त्री हे आनंदीबाईचे आजोबा. त्यांचे वय त्यावेळी ७५ वर्षांचे होते. मेहेंदळे हे त्यांचे गुरु मानले तर त्यांचे वय सहज शंभरीच्या पलिकडे असले पाहिजे. त्या दृष्टीनेही हा प्रसंग अस्वाभाविक वाटतो.

(२) गोपाळराव गाढवगाढवीचे लग्न लावतात, आणि बाप्तिस्मा घेतात हे प्रसंग आनंदीबाईच्या मृत्यूनंतरचे— काही वर्षांनी घडलेले. आनंदीबाईचे यजमान म्हणून काही वर्षे प्रसिद्धीच्या झगझगाटात बावरलेले व थोरामोठ्यांशी ओळखी झालेले गोपाळराव, आनंदीबाईच्या मृत्यूनंतर विस्मृतप्रायच होतात. ती प्रसिद्धी व तो परिचय परत लाभण्याकरिताच की काय गोपाळराव कालांतराने गाढवगाढवीचे लग्न, बाप्तिस्मा घेऊन परत हिंदुधर्मात येणे, पंचहौद मिशनतर्फे समाजातील प्रतिष्ठिताना आमंत्रणे देऊन त्यांची फजिती उडविणे वगैरे उपद्व्याप करू लागले. हे उपद्व्याप अगदीच निरर्थक ठरले अशातील भाग नाही. महाराष्ट्रातील समाजसुधारणेच्या कार्याला हे धक्के उपकारकच ठरले. त्या दृष्टीने महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासात गोपाळरावांच्या या उपद्व्यापाना महत्वाचे स्थान आहे. पण आनंदीबाईच्या मृत्यूनंतरच्या या घटनांतील पहिल्या दोन श्री. जोशी यांनी आधीच्या काळात कां ओढल्या ? आनंदीबाईचे शिक्षण, गाढवगाढवींचे लग्न, बाप्तिस्मा प्रकरण आणि पंचहौद मिशन प्रकरण हे गोपाळरावांच्या जीवनातील महत्वाचे प्रसंग. या कादंबरीच्या कक्षेत त्यातील एकच येतो आणि त्यामुळे गोपाळरावांच्या व्यक्तिचित्रणात पुरेसा रंग भरत नाही, या कल्पनेनेच श्री. जोशी यांनी पुढील तीन प्रसंगातील दोन आधी ओढलेले दिसतात. शक्य असते तर पंचहौद-मिशन प्रकरण सुद्धा त्यांनी अलिकडे ओढले असते; पण तसे केले असते तर लोकमान्य टिळकांकडून आनंदीबाईला शंभर रुपये मिळाले नसते, कारण त्यांना देखील गोपाळरावांनी त्या प्रकरणात गुंतवले होते. बहुधा याच कारणाने श्री. जोशी यांनी ते प्रकरण अलिकडे ओढण्याचा मोह आवरलेला दिसतो.

## सत्याची ही प्रतारणा

वरील दोन प्रकरणे अलिकडे ओढल्याने केवळ कालविपर्यासाचाच दोष निर्माण झाला आहे असे नाही, तर त्याने गोपाळरावांच्या स्वभावचित्रणातही सत्याचा विपर्यास झाला आहे. कादंबरीत गोपाळराव या दोन विक्षिप्त कार्यात गुंततात ते आनंदीबाईच्या अखेरच्या दिवसात. त्याने ते विक्षिप्तपणाचेच नव्हे तर निर्घृणतेचेही धनी होतात. परंतु आनंदीबाईच्या या अखेरच्या आजारात त्यांनी रात्रंदिवस तिची मनोभावे शुश्रूषा केली, असे काशीताईंच्या चरित्रात सांगितले आहे. गोपाळरावांच्या पत्रांवरूनही ते खरे असावेसे वाटते. आनंदीबाई ही गोपाळरावांचीच निर्मिती असल्यामुळे ते स्वाभाविकही वाटते. मग श्री. जोशी यांनी ही प्रतारणा कां केली आहे ? कादंबरीत रंग भरावा म्हणून !

गाढवगाढवीचे लग्न व गोपाळरावांचा बाप्तिस्मा ही दोन प्रकरणे श्री. जोशी यांनी पुढे ओढली, त्याची अंशतः भरपाई विष्णुशास्त्री चिपळूणकरांचा मृत्यु दीड-एक वर्षांनी पुढे ढकलून केलेली दिसते ! विष्णुशास्त्री यांचा मृत्यु १७ मार्च १८८२ला रोजी झाला. त्यावर आनंदीबाईने १० श्लोक व आर्या रचून १९ एप्रिल १८८२ ला श्रीरामपूरहून पाठविल्या. श्री. जोशी यांनी आनंदीबाई रोसेलला पोचल्यावर (जून १८८३ ) दोन चार महिन्यांनी तिला गोपाळरावांच्या पत्रावरून ही बातमी कळते आणि ती तेथून वरील श्लोक व आर्या पाठविते, असे दाखविले आहे. या व्युत्क्रमानेही नुसता कालविपर्यास होत नाही तर आनंदीबाईच्या

* पु. वा. कुळकर्णी 'मामा परमानंद आणि त्यांचा कालखंड' मुंबई १९६३, पृ. ५०८







स्वभावचित्रणालाही उणेपणा येतो. विष्णुशास्त्रींच्या मृत्यूची बातमी तिला दीड वर्षांनी गोपाळरावांच्या पत्रावरून कळते. यावरून ती बंगालात श्रीरामपूरला असताना महाराष्ट्राबद्दल संपूर्णपणे उदासीन होती, असा समज होतो आणि विष्णुशास्त्र्यांच्या मृत्यूने तिला झालेल्या शोकाला काही अर्थ राहात नाही. शिवाय दीड वर्षात — अमेरिकेस जायचे ठरल्यापासून — तिची बौद्धिक वाढ झपाट्याने होऊ लागली होती. तिच्या कलकत्त्यातील भाषणात तिचा पुरेपूर प्रत्यय येतो. तिच्याशी हे काव्य हे अगदीच विसंगत वाटावे एवढे ते पोरकट आहे. एखाद्या स्त्रीस मूल झाले आणि त्यानंतर वर्षाने तिचा पती दिवंगत झाला, या घटनांचा व्युत्क्रम केला तर केवळ कालविपर्यास होत नाही तर त्या स्त्रीचीही विटंबना होते ! एवढा हा दोष भयावह आहे ! श्री. जोशी यांचा हा गोंधळ कां व्हावा, या विषयी एक तर्क संभवतो. रेसिडंट-कडून अनन्वित छळ होत असलेल्या ज्या कोल्हापूरच्या राजाची बाजू घेऊन टिळक-आगरकर लढले व तुरुंगात गेले, तो राजा २५ डिसेंबर १८८३ रोजी मृत्यु पावला. ही बातमी गोपाळरावांनी आनंदीबाईला कळविली, तेव्हा त्या दुर्दैवी राजाच्या मृत्यूबद्दल सुटकेचा निश्वास टाकून विष्णुशास्त्री, केशवसेन इत्यादींच्या मृत्यूबद्दल हळहळ व्यक्त करणारे पत्र त्यांनी गोपाळरावांना पाठविले. (चरित्र पृ. २५९–६०). काशीताईंच्या चरित्राच्या दुसऱ्या आवृत्तीत हा संदर्भ गाळलेला आहे. त्यावरून विष्णुशास्त्र्यांच्या मृत्यूची बातमी आनंदीबाईला अमेरिकेत कळली, असा श्री. जोशी यांचा गैरसमज झालेला असावा. काशीताईंच्या चरित्राची पहिली आवृत्ती किंवा आनंदीबाईने केसरीच्या संपादकाना पाठविलेल्या पत्रावरील तारीख त्यांनी पाहिली असती तरी या गैरसमजाचे सहजच निराकरण झाले असते. पण तेवढी काळजी घ्यायची कुणी !

(३) श्री. जोशी प्रस्तावनेत लिहितात, "गोपाळरावांच्या व्यक्तिमत्त्वाची पार्श्वभूमी आनंदीबाईच्या चरित्राला लाभल्याकारणाने त्याची रंगत फार वाढलेली आहे." आनंदीबाईच्या चरित्राला खरी पार्श्वभूमी लाभली आहे ती तत्कालीन समाजस्थितीची. ती पार्श्वभूमी दृष्टिआड झाली तर तिच्या जीवनाला काहीच अर्थ राहात नाही. श्री. जोशी यांना या पार्श्वभूमीचे स्वरूप व महत्त्व पूर्णपणे उमगलेले दिसत नाही. त्या काळाचा अभ्यास करण्यासाठी न. र. फाटक यांचे 'रानडे चरित्र' व लोकहितवादींची 'शतपत्रे' आपण वाचली असे ते सांगतात. त्या ऐवजी हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्या त्यांनी अभ्यासिल्या असत्या, तर तो अभ्यास जास्त लाभदायक ठरला असता. या कादंबरीतील बरेच प्रसंग आधुनिक काळातच घडल्यासारखे त्यांनी चित्रित केले आहेत. काळाचा संदर्भ विसरल्यामुळे झालेल्या लहानसहान तपशिलाच्या चुका पुष्कळच आहेत. त्यांकडे काणाडोळा करून महत्त्वाच्या चुकाच तेवढ्या पाहू.










## काव्य—गायन

ऐका कथा अशी की, ती काव्य—गायनाची ।
रसिका क्षमा असावी, की स्पष्ट बोलण्याची ॥
ना तथ्य फारसेही, अंदाज एक वेडा ।
की श्रोतृ—वृन्द तो हा, जवळून पाहु थोडा ॥
अर्वा अर्वाक की ज्या, काव्यात राम नाही ।
उरला तयातुनी त्या, आराम ना घरीही ॥
त्यातून शेष जो हा, दिसते न काम त्याही ।
द्या दाद वा न द्या ती, गातील की कवीही ॥

— पंडित महाजन

### जावयाला असे पाहणे त्या काळी शक्य होते

यमूच्या घरच्या बायका गोपाळरावांना पहाण्यासाठी कल्याणच्या पोस्टात जातात, त्याचे वर्णन श्री. जोशी यानी पुढीलप्रमाणे केले आहे :—

" यमूच्या आईने ठेवणीतला पोशाख केला. अंगावरून शेला घेतला. आसपासच्या घरांतील एकदोन बायकांना घेऊन त्या निघाल्या.

"हलक्या पावलांनी, एकमेकांशी काही न बोलता कल्याणच्या रस्त्यावरून कडेकडेने ती वरात निघाली ! आसपासच्या लोकांना संशय येऊ देणे हिताचे नव्हते! अशी गोष्ट आजतागायत त्या ब्राह्मणवस्तीत घडली नव्हती ! बायका नवऱ्यामुलाला पाहायला पोस्टात निघाल्या आहेत, असे कळले असते तर हलकल्लोळ उडाला असता. आसपासच्या लोकांनी बोचून बोचून खाल्ले असते. म्हणून बायकांनी हळदीकुंकवाचा पोशाख केला होता. लग्नाच्या पानसुपारीला जावे तसे कपडे दिवाणजीनी घातले होते.

" तिकिटांच्या खिडकीजवळ जाऊन दिवाणजीनी कार्ड मागितले. यमूची आई नि इतर बायका गजाजवळ गेल्या आणि माना उंचावून आत बघायला लागल्या. खिडकीजवळच्या कारकुनाला थोडे चमत्कारिक वाटले.

" बायकांनी एकमेकीला हाताने ढोसून दाखविले. अस्पष्टशी कुजबूज एकमेकींच्या कानात करून सांगितले की तोच नवरा मुलगा !"

' आसपासच्या लोकांना संशय येऊ नये' म्हणून कादंबरीकारांनी खूप खबरदारी घेतली आहे ! यमूची आई निघाली ती ' आसपासच्या घरांतील एकदोन बायकांना घेऊन. ' जणु काय त्या बायका गावात हलकल्लोळ उडवणारी ही गोष्ट आपल्या पोटातच ठेवणार होत्या ! ' बायकांनी हळदीकुंकवाचा पोशाख केला ' आणि आपल्याला तो पोशाख अंमळ कसासाच दिसेल म्हणून ' दिवाणजीनी लग्नाच्या पानसुपारीला जावे तसे कपडे घातले.' जणु काय गावात कुठे हळदीकुंकू वा लग्नाची पानसुपारी आहे की नाही याची वार्ता गावातील लोकांना अगदीच नव्हती ! आणि ही वरात गेली कुठे तर पोस्टात, एक कार्ड विकत घ्यायला. ज्या काळी कपड्याच्या दुकानातही बायका जात नसत, त्या काळात या बायका खुशाल पोस्टात कार्ड विकत घ्यायला शिरतात, गजांजवळ जातात, माना उंचावून आत पाहतात, एकमेकीला ढोसतात, कुजबुजतात आणि कुणालाही काही कळत नाही—कुणालाही!

श्री. जोशी यांची कल्पना शंभर वर्षांपूर्वीच्या काळात, कल्याण गावात, तेथल्या पोस्टाच्या परिसरात वावरत नसून आजच्या काळात, पुणे शहरात, सिटी पोस्ट ऑफिसच्या आसपासच घोटाळत आहे. त्या काळात पोस्टाच्या इमारतीतच मागच्या अंगास पोस्टमास्तरचे बिऱ्हाड असे – आजही कित्येक पोस्टात असते. काशीताईनी ' पोस्टाच्या ऑफिसातच पोस्टमास्तरला राहण्यास जागा असते. तशी गिरगावातही होती ' असे लिहिले आहे ते लक्षात घेतले असते, तर नेहमीच्याच पोशाखात यमूच्या घरच्या बायका पोस्टमास्तरीणबाईकडे सहज म्हणून गेल्या असाव्यात आणि मधले दार किलकिले ठेवून त्यांनी गोपाळरावांना पाहिले असावे, हे सहजच कळले असते. खुद्द काशीताईनीही ' मागल्या दाराने जाऊन त्यांनी जावईबोवांची मूर्ती पाहिली,' असेच या प्रसंगाचे निवेदन केले आहे.

अमेरिकेत असताना आपला एक फोटो आनंदीबाईने गोपाळरावास पाठविला आणि त्यात तिचा पदर खांद्याखाली पडलेला पाहून गोपाळरावांनी गहजब केला. त्यासंबंधी आपल्या पत्रात आनंदीबाई म्हणते, " पीतांबराचा पदर खांद्याखाली पडला. तो निष्काळजीपणामुळे नाही, तर अवचित पडला. ते माझ्या लक्षात आले नाही, व दुसऱ्या कोणासही समजून आले नाही. म्हणून जशीच्या तशीच तसबीर निघाली " ( चरित्र पृ. २४३) हे स्पष्टीकरण बरोबर दिसते. बायकांना पदराची आठवण होते ती पुरुषांचे वक्षस्थलाकडे लक्ष गेलेले दिसले की. अमेरिकेत पदर घेण्याची रीतच नसल्यामुळे पुरुषांचे त्याकडे लक्ष जात नाही आणि म्हणून आनंदीबाईचेही गेले नाही. श्री. जोशी यांनी त्याचे स्पष्टीकरण वेगळ्याच प्रकारे केले आहे. समुद्राच्या किनाऱ्यावर वाऱ्याने पदर फडफडत असतानाच पॉकेट कॅमेऱ्याने तिचा फोटो काढला गेला आणि पॉकेट कॅमेरा तिने तोवर पाहिलेलाच नसल्यामुळे आपला

अनुक्रमणिका










# पाळण्याला सुटी

रामू आता तीन वर्षांचा झाला आहे. जन्मापासून पाळणा त्याचा जोडीदार होता. पण आपण आता मोठे झालो आहोत असं रामूला वाटतं. झोके देणारा, झोप आणणारा पाळणा आता त्याला नको वाटतो. म्हणून पाळण्याला सुटी मिळाली आहे. आता तो पाळण्याचा उपयोग खेळणी, चित्रे वगैरे ठेवण्याकडे करीत असतो. आई ते कौतुकाने पाहते. रामू खुषीत आहे. आईलाही समाधान आहे. "आपण पाळण्याला सुटी दिली हे किती चांगलं झालं ?" रामूचे वडील तशाच समाधानाने पत्नीला सांगतात. "होय; त्यांनी फार चांगली गोष्ट केली.

**शहाणे आईबाप**

आता आपलं कुटुंब मर्यादित ठेवतात. मुलं कमी होऊ देणे एवढेच कुटुंब नियोजनाचे उद्दिष्ट नाही. पाहिजेत तितकीच व पाहिजेत तेव्हाच मुलं होऊ देणे त्यामुळे साध्य होऊ शकते. अपत्यजन्म ही आता योगायोगाची किंवा नशीबाची गोष्ट नाही; ती तुमच्या हातांतील गोष्ट आहे. असे संसारसुख प्राप्त होण्याचे कारण—

**कुटुंब नियोजन.**

मोफत सल्ला मिळण्यासाठी नजीकच्या कुटुंब नियोजन केंद्राला भेट द्या.







davp 68/441

फोटो निघाला, हे तिला कळलेच नाही, असे त्याचे स्पष्टीकरण आहे. पॉकेट कॅमेऱ्याचा शोध आनंदीबाईच्या मृत्यूनंतर १८८८ मध्ये लागला. पण श्री. जोशी यांना त्याचे काय ? त्यांनी आधुनिक सिनेमात वा दिवाळी अंकात शोभेलसा आनंदीबाईचा फडफडत्या पदराचा फोटो पॉकेट कॅमेऱ्याने १८८४ मध्येच काढून टाकला ! 'पिसाट वारा मदनाचा । पतंग उडवी पदराचा ' असा आनंदीबाईचा उत्तान फोटो पाहून गोपाळरावांना राग आला नसता तरच आश्चर्य !

## काळाचे अवधान सुटले

अमेरिकेहून भारतात परत येत असता आनंदीबाई एडनहून सासूबाईला पत्र लिहिते, असे म्हणून श्री. जोशी यांनी त्या पत्रातील काही मजकूर उद्धृत केला आहे. इथेही श्री. जोशांचे काळाचे अवधान सुटलेले दिसते. त्या काळी काही विमानाची वाहतूक नव्हती. मग एडनहून टाकलेले पत्र सासूबाईंना केव्हा मिळणार? आनंदीबाई भेटल्यानंतरच. काशीताईंचे पुस्तक निष्काळजीपणाने वाचल्याचा हा परिणाम. त्या पुस्तकात गोपाळरावांनी एडनहून 'अमेरिकेत' कार्पेटरबाईला पाठविलेले पत्र उद्धृत केले आहे आणि त्याच्या खालीच आनंदीबाईने अमेरिकेहून निघण्याआधी सासूबाईला पाठविलेल्या पत्रातील मजकूर उद्धृत केला आहे. ( चरित्र पृ; ३७५–७६ ). श्री. जोशी यांना वाटले दोन्ही पत्रे एडनहूनच पाठविली. आपण कोणत्या काळातील कथा लिहितो आहोत याचे अवधान राखले असते, तर अशी ढोबळ चूक होती ना.

कादंबरीची रंगत वाढविण्याकरिता श्री. जोशी यांनी गाढव-गाढवीच्या विवाहाचा सोहळा तीन वर्षे अलिकडे ओढला आहे एवढेच नाही, तर त्याच्या वर्णनात श्री. जोशी यांनी स्थलकालाचे भानही सर्वस्वी सोडलेले आहे. या विवाहाच्या आधी दोन दिवस गोपाळराव नाहीसे होतात. गोपाळरावांचे धाकटे बंधू गावात इकडे तिकडे चौकशी करीत हिंडतात, पण ते कुठेच सापडत नाहीत. विवाहाच्या दुसऱ्या दिवशी गोपाळराव घरी परततात. त्याच्या आधी 'सुबोधपत्रिके'तील बातमीवरून गोपाळरावांच्या बंधूंना व कुटुंबियांना या विवाहाची माहिती कळलेली असते. हा कादंबरीतील या प्रकरणाचा गोषवारा. हे प्रकरण रंगवताना ज्या पुण्यात लेखकाची उभी हयात गेली त्या पुण्याचा, त्या पुण्यातील लोकांचा, त्या पुण्यातील वर्तमानपत्रांचा सगळ्या सगळ्यांचा विसर त्यांना कसा पडला ? पुणे हे शहर असे आहे की एका आळीच्या कोपऱ्यात जरी खुट्ट झाले तरी सबंध शहरात त्याचे प्रतिध्वनी उमटतात. त्या काळी तर पुणे आजच्याहून वरेच लहान आणि खूपच रिकामटेकडे होते. गाढवगाढवीचा विवाह झाला तो आधी आमंत्रणपत्रिका काढून आणि त्याही गोपाळराव व वासुदेव गणेश जोशी म्हणजे चित्रशाळेचे वासुकाका जोशी यांच्या नावाने. म्हणजे विवाहाच्या आधी काही दिवस ही आमंत्रणपत्रिकाच पुण्यात गाजत असणार. ही आमंत्रणपत्रिका कादंबरीत दिली आहे. त्यानंतर विवाह साजरा झाला तो नारायण पेठेत वाशिंगे, ताशे, मर्फे, पानसुपारी वगैरे थाटात. हेही कादंबरीत दिले आहे. हे सगळे होत असता पुण्यातल्या पुण्यातच गोपाळरावांच्या कुटुंबियाना त्याची गंधवार्ताही असू नये, गावात इकडे तिकडे चौकशी करीत असताही लागू नये, आनंदीबाईच्या समाचाराला येणाऱ्या कुणीही सांगू नये, हे पुणेकरांच्या लौकिकाला शोभते तरी का ? बरे दुसऱ्या दिवशी ही माहिती कळते तीही मुंबईच्या 'सुबोधपत्रिके'वरून खुद्द पुण्यातच एवढी खळबळजनक घटना घडत असता ज्ञानप्रकाश, केसरी, सुधारक, लोककल्याणेच्छु, ज्ञानचक्षु, पुणेवैभव इत्यादी पुण्यातील वृत्तपत्रे काय करीत होती ? त्यातील काही दैनिके नसतील, पण 'सुबोधपत्रिका' तरी कुठे दैनिक होते ? शिवाय ते वृत्तपत्रही नव्हते. ते होते प्रार्थना समाजाचे दर सोमवारी प्रसिद्ध होणारे साप्ताहिक. पण त्यानेही ही बातमी देण्याकरिता दुसऱ्याच दिवशी म्हणजे शनिवारी खास अंक काढून सकाळी सकाळीच पुण्यास पाठविलाच ना ? त्यातील खरी गोष्ट अशी आहे की, गाढवगाढवीचा विवाह झाला शुक्रवार १८-१२-१८९० ला आणि 'सुबोध पत्रिकेत' बातमी आली ती सोमवार २८-१२-१८९०-च्या अंकात. म्हणजे तब्बल दहा दिवसांनी. श्री. जोशी यांना ती पाउणशे वर्षांनी पुं. बा. कुळकर्णी यांच्या पुस्तकात वाचायला मिळाली. आणि त्यांनी 'सुबोधपत्रिके'तील बातमी वाचली म्हणून गोपाळरावांच्या बंधूनीही ती 'सुबोधपत्रिके'तूनच वाचली असावी, असा त्यांचा भोळा समज झाला.

या अनवधानाने उद्भवलेल्या चुका झाल्या. आपल्या चालीरीतीविषयीच्या अज्ञानातून उद्भवलेली एक चूक मुद्दाम उल्लेखनीय अशी आहे. गोपाळराव आनंदीबाईला अमेरिकेत भेटतात, तेव्हा 'हिंदु स्त्रिया नवऱ्याला ज्या पद्धतीने एकांतात नमस्कार करतात, तसा तिने त्यांना केला' असे श्री. जोशी लिहितात. ( आ. गो. पृ. २९४) हे वाचले आणि भलतीच चुटपूट लागली. विवाहित असूनही हा नमस्कार मला आजवर लाभला नव्हता. गोपाळराव व आनंदीबाई यांच्या संभोगाचेही साग्रसंगीत वर्णन करणारे श्री. जोशी जेव्हा इथे सूचक लिहितात, तेव्हा त्या नमस्कारात तसेच काही विशेष असावे, ही कल्पना अस्वस्थ करू लागली. आपल्या

नुकसानीचा अंदाज घ्यावा म्हणून अनेक मित्रांना विचारून पाहिले. पण तेही माझ्या सारखेच करंटे निघाले. आधीच्या पिढीत तपास केला, पण तरीही काही प्रकाश पडेना. शेवटी एका वृद्ध स्त्रीने सांगितले की, विवाहित स्त्री पतीला उभ्या आयुष्यात फक्त दोनदा नमस्कार करते; एकदा गर्भाधानाच्या आधी आणि दुसऱ्यांदा अष्टपुत्रा झाल्यावर प्रजोत्पादन थांबवताना. म्हणजे हा दुसरा अपवादभूतच; एकच खरा. हे नमस्कारही काही विशेष पद्धतीने करायचे असतात, असेही नाही. इतर वडील माणसाना करतात तसेच. हे ऐकल्यावर माझा जीव भांड्यात पडला.

## 'पोलका' म्हणजे 'बंडी' नव्हे

याशिवाय भाषेच्या अज्ञानामुळेही झालेली एक चूक उल्लेखनीय आहे. आनंदीबाईंच्या अमेरिकेतील पोषाखाच्या संदर्भात बंडी. हा शब्द वारंवार येतो. ही बंडी म्हणजे काय? त्या काळच्या मराठी स्त्रिया आजच्या प्रमाणे पोलकी किंवा ब्लाऊज घालीत नसत; चोळ्या घालीत असत. आनंदीबाई अमेरिकेत पोलका घालायला लागली. हा लांब बाह्यांचा असे. तिने गोपाळरावांना पत्रे पाठविली ती इंग्रजीत. त्यात तिने polka हा इंग्रजी शब्दच वापरला. त्या पत्रांची भाषांतरे करताना भाषांतरकारानी polka या शब्दाचे भाषांतर बंडी असे केले. आज पोलका हा शब्द मराठीत रूढ झाला आहे. एवढेच नव्हे तर बंडी आणि पोलका हे शब्द भिन्न अर्थाने वापरात आहेत. अशा प्रसंगी कादंबरीकाराने पोलका हाच शब्द वापरायला हवा होता. तसे न केल्यामुळे अमेरिकेत बंडी घालणाऱ्या आनंदीबाईचे भलतेच बावळट ध्यान डोळ्यांसमोर येते.

(४) हे पार्श्वभूमीसंबंधी झाले. या पार्श्वभूमीवर रंगवलेली आनंदीबाई व गोपाळराव यांची व्यक्तिचित्रणे तरी सत्याशी कितपत सुसंगत आहेत?

श्री. जोशी यांनी चित्रित केलेली आनंदी लग्न झाल्यावरही नवऱ्यासमोर 'नाकात बोट घालून शेंबूड काढण्या'-एवढी गलिच्छ (पृ. ७६), अमेरिकेला जायला निघेपर्यंत 'घरात मुळुमुळू रडणारी, सारखी धास्तावलेली, ब्रह्मसमंधाने धरलेल्या झाडाप्रमाणे दिसणारी केविलवाणी' (पृ. १९३), अमेरिकेतही 'गोपाळरावांच्या डोळ्यांतल्या आगीची झळ लागून' करपून जाण्याऐवढी अनन्यगतिक (पृ. २२३), अमेरिकेहून परतताना भरतकाम केलेल्या चित्रावर कॉडलिव्हर ऑईल पडून ते खराब झाल्यामुळे 'खूप रडावसं वाटण्या'एवढी हळवी आणि 'गोपाळरावांच्या धाकामुळे धड रडूही न शकण्याएवढी भित्री (पृ० ३२५), मृत्युशय्येवर पडेपर्यंत गोपाळरावांना ओळखू न शकण्याएवढी भावडी (पृ० ३४८), शेवटच्या आजारात टिळकांचे पत्र आले असता 'नाव फारसे ऐकले नव्हते' असे म्हणण्याएवढी अडाणी (पृ० ३४२), अशी आहे. कलकत्त्याला भाषण करतेवेळी ती 'रणरागिणी, अंबा, आकाशाला भिडणारी ज्वाला' वाटते, कार्पेंटर कुटुंबात रमली असता ती आनंदी, हौशी व खेळकर वाटते, आणि परीक्षेतील यशामुळे ती बुद्धिमान वाटते हे खरे. पण हे केवळ तात्कालिक उद्रेक वाटतात. एरवी पहिल्यापासून अखेरपर्यंत दर्शन घडते ते झपाटलेल्या व धास्तावलेल्या केविलवाण्या झाडाचे!

आनंदीबाईचे हे चित्रण सत्याला कितपत धरून आहे? काशीताईंच्या चरित्रग्रंथात दिसते ती आनंदीबाई याहून किती वेगळी आहे! ती काही काशीताईंनी कल्पनेने निर्माण केलेली नव्हे. कार्पेंटरबाईला, गोपाळरावांना व इतरांना तिने लिहिलेली पत्रे, कलकत्त्याला तिने केलेले भाषण, अमेरिकन व भारतीय नियतकालिकातील वृत्तांत, तिचे केसरीत प्रसिद्ध झालेले पत्र, कार्पेंटरबाईच्या ३७ प्रश्नांना तिने दिलेली उत्तरे इत्यादी आधार मुळातून देऊन आणि खुद्द कार्पेंटरबाई व गोपाळराव जोशी यांच्याकडून मिळविलेल्या माहितीची त्याला जोड देऊन साकार व सजीव केलेली ही आनंदीबाई आहे. हे चरित्र लिहिताना काशीताईंनी घेतलेले श्रम खरोखरच कौतुकास्पद आहेत. विशेषतः त्यांनी दिलेले पत्रादिकांचे आधार हा या ग्रंथाचा अपूर्व विशेष आहे. या पत्रादिकातून व्यक्त होणारी आनंदीबाई तिच्याविषयीच्या कार्पेटरबाईनी व गोपाळरावांनी दिलेल्या माहितीशी एवढी मिळतीजुळती आहे की त्यांच्या माहितीच्या खरेपणाबद्दल जराशीही शंका उत्पन्न होत नाही.

[उत्तरार्ध पुढील अंकी]



### पारंब्या

दूर राहिली वाट सुखाची
स्मशानातली भयाण शांती

करपलेली एक लव्हाळी
ओले पाऊल, ओल्या वाटा

दुभंगलेली स्वप्नं सारी
जोडित होतो स्वकष्टानं
उचलुन गेली हुकमी पानं
पत्रावळी अन् हाती उरल्या

धुरळत गेली आशा सारी
वावटळी अन् मनात उठल्या
गेले हलवून तन हे सगळे
धुरकटले अन् मनात वारे

नाही उरले तळपात जीवन
उगाच घेतो माठ, शिरावर
माळ चालतो वैराणातून
पारंब्यांची उरे सावली

—श्रीधर ग. माडगूळकर







अनुक्रमणिका




**कधी बहर, कधी शिशिर ● वलय**

## जीवनातील विविधतेचे दर्शन घडविणारा कथासंग्रह

अलिकडे वेगाने कथा-कादंबरी लेखन करीत असलेले श्री. प्रभाकर अत्रे यांचा "कधी बहर, कधी शिशिर" हा ताजा कथा-संग्रह. एकूण आठ कथा असलेल्या या संग्रहातील सहा कथांचा विषय प्रीति हा आहे. मात्र यातील प्रत्येक कथेतील प्रीतीचे रूप वेगळे, कथा वेगळी, व्यथाही वेगळी! 'कधी बहर'मधील न्यायाधीश आणि त्याची प्रेमिका मधुमती यांचे लग्न होऊ शकले नाही. मधुमती आपल्या संसारात गुरफटली आणि न्यायाधीश आपल्या व्यवसायात मग्न झाला. अनेक वर्षांनी दोघांची भेट होते. आपण अद्यापही परस्परांवर अनुरक्त आहोत ही खात्री पटते. पण दोघांच्या संयमी आणि विचारी वृत्तीने वावगे तर काही घडत नाहीच, उलट त्यांची प्रीती उदात्ततेच्या पातळीवर जाते. न्यायाधीशाच्या प्रेरणेने मधुमतीला तिचे गेलेले सूर सापडतात आणि त्यातच आपल्या प्रीतीचे साफल्य झाल्याचे समाधान तो मानतो.

दोन प्रेमिक अनेक वर्षांनी भेटल्यावर आणि आपले प्रेम पूर्वीइतकेच ताजे आहे याची साक्ष पटल्यावर काय वाटेल ते होऊ शकले असते. कथेने वेडीवाकडी अन् गलिच्छ अशी वळणे घेतली असती; पण अत्र्यांची ही कथा आणि ह्या संग्रहातील साऱ्याच कथा अशा वळणांपासून अलिप्त आहेत. काहीतरी उच्च, उदात्त, पवित्र यांचाच ध्यास त्यांच्या लेखणीने घेतलेला सतत जाणवतो.

'तू तर स्वप्नांची राणी' मधील सुप्रिया संगीतशत्रू असते. गायक उमेश तिच्या जीवनात येतो आणि ती गाणे शिकते. दोघांचे प्रेम जडते. पण मीलन होत नाही. कारण सुप्रियाचे लग्न लहानपणीच झालेले असल्याची जाणीव तिचे पिताजी देतात. हे कळताच खंबीर मनाने उमेश तिच्या जीवनातून निघून जातो आणि सुरांच्या संगतीत व सुप्रियाच्या स्मृतींच्या सहवासात तो जीवन व्यतीत करू लागतो. 'मधुमती'-मधील शिक्षक मिलिंद सरदेसाई आणि त्याची शिष्या मधुमती आपली प्रीति सफल होणार यावद्दल निश्चित होती; पण अगदी विचित्र परिस्थितीत मधुमतीचे लग्न दुसऱ्या तरुणाशी ठरवणे भाग पडले. त्यावेळी मोठ्या मनाचा मिलिंद तिला सांगतो "नकोस पाहू वळून सखे, जा. नकोस पाहू वळून। काल दिलेल्या वचनाखातर नकोस राहू अडून।"

'डाव' कथेचा नायक 'मी.' त्याची पत्नी दिवंगत होते. मुलाच्या संगोपनासाठी तो नीलाला नोकरीवर ठेवतो. हळुहळू लीलाच्या जागी तो नीलाला मानू लागतो. नीलाला त्याच्या मनाची चलविचल कळते. आणि ती निघून जाते. त्या दिवशी नायकाला जाणवते की, आज आपण लीला गेल्यानंतर प्रथम विधुर झालो आणि आपला पुत्र पोरका झाला. तो पोरका होण्याला आपण कारणीभूत झालो, ही खंत त्याला बोचते.

ह्या साऱ्या कथा वाचल्या म्हणजे विफल प्रीती हा अत्र्यांचा आवडता विषय असावा आणि त्या विफल प्रीतीची भिन्न भिन्न रुपे रंगविण्यात त्यांची लेखणी रंगत असावी असे वाटते. एक गोष्ट उल्लेखनीय –प्रेमात अयशस्वी झालेली अत्र्यांची पात्रे आक्रस्ताळेपणा करीत नाहीत. ती शांतपणे त्या अपयशाला सामोरी जातात. दुसऱ्याला ताप न देता, स्वतः मनःस्ताप भोगतात.

'अनघा' कथेतील अनघा ही मनमोकळेपणाने पुरुषात मिसळणारी मुलगी. हा मनमोकळेपणाच तिचा दोष ठरतो. ती चांगल्या चालीची नसावी असा उगीचच अपसमज होतो आणि त्यामुळे तिला अविवाहित रहावे लागते. 'योग'मधील अमिता देसाईच्या लग्नाचा योगच जमून येत नाही. आकर्षक, गव्हाळ रंगाची, नाकी डोळी ठसठशीत अशा अमिताचे ठरलेले लग्न मोडते आणि नंतर लग्नाचा कधी योगच येत नाही. अनघा आणि अमिता ह्या दोघींवर दैवाची अवकृपा दिसते. दोष त्या दोघींचाही नाही. 'वैजयंती'मधील वैजयंतीला पतिसुख न मिळाल्याने ती आत्महत्येचा मार्ग स्वीकारते. तिच्यावर ही पाळी यावी हा दैवयोगच! गरीब रवि कर्णिक मामांच्या आश्रयाने राहतो. तेथे त्याची मामेबहीणच त्याची वैरीण ठरते. नको ते ती मागते. तो घर सोडून पळून जातो. त्याच्या जीवनाचा मार्गच बदलतो. 'जन्मठेप'मधील रवीची ही कथा मनाला अस्वस्थ केल्याविना रहात नाही.

ह्या संग्रहातील साऱ्या कथांचे निवेदन प्रथमपुरुषी असल्याने एकसुरीपणाचा दोष निर्माण होतो. आणि कथांच्या कक्षांना अपरिहार्यपणे मर्यादा पडतात. वास्तविक हे टाळणे अत्र्यांना अगदी शक्य होते. निवेदन प्रथमपुरुषी असले तरी साऱ्या कथांचे प्रारंभ आणि शेवट अगदी वेगवेगळे आणि वेधक वाटतात. काही ठिकाणी निवेदनाचे सूत्र सांधा वदलते. 'जन्मठेप' मध्ये हॉटेलचे विल रवी जेव्हा देत नाही, तेव्हा वाटते की

ह्या लबाड माणूस असावा. पण तो विषय तेथेच संपतो. ' योग ' मध्ये अमिता देसाई 'मी ' च्या हाताखाली नोकरीस येते त्यावेळी वाटते की, मी आता ह्या पोरीच्या मागे लागणार. पण तसे काहीच घडत नाही. दोन्ही कथातले हे अपेक्षाभंग सुखद वाटतात.

' डाव' मध्ये " मला वरं वाटलं अन् देवालाही बरं वाटलं असे सांगण्यात आले आहे ' देवालाही बरं वाटलं या शब्दांची बिलकुल आवश्यकता नव्हती. त्या शब्दांमुळे उगीचच कृत्रिमपणा येतो. ' योग ' कथेच्या शेवटी म्हटले आहे ' रस्त्याने जाताना आकाशाकडे हे पहात मी मोठ्याने म्हणालो " आकाशस्थ ग्रहांनो, या अमिताचे गाऱ्हाणे ऐका एकदा ! " हा प्रकारही कृत्रिम आणि जुन्या काळच्या कथांची, नव्हे गोष्टींची आठवण करून देतो.

अत्र्यांची भाषा ओघवती असून तिच्या अंगी वाचकाला ओढत नेण्याची ताकद आहे. त्यांची निवेदनशैली प्रभावी आहे. शब्दांवर त्यांची योग्य हुकुमत असून निरर्थक पाल्हाळाचा दोष त्यांच्या लेखनात डोकावत नाही. मोजक्या शब्दांनी ते पात्रे आणि प्रसंग जिवंत करतात. शृंगाराचे त्यांना वावडे नाही, प्रेमकथांची त्यांना हौस आहे. तरीही शुद्ध शृंगार आणि अश्लीलतेचे मोकाट प्रदर्शन यातला भयानक भेद ते चांगला जाणतात. अश्लीलतेपासून त्यांची कथा कित्येक योजने दूर दिसते. जीवनातील विविधतेचे विपुल दर्शन त्यांची कथा घडवीत असते. आणि हे सारे करीत असताना त्यांच्या लेखणीला उदात्ताचा ध्यास आहे हे जाणवल्याविना रहात नाही.

चित्रकार दीनानाथ दलाल यांच्या कुशल कुंचल्याने या कथा संग्रहाचे मुखपृष्ठ सजले आहे.

**–वि. ग. सातारकर**

[ ' कधी बहर, कधी शिशिर ' ले. प्रभाकर अत्रे. प्रकाशक — गो. वि. देशपांडे. श्री. शारदा प्रकाशन. ५९४, नारायण पेठ, पुणे २. मूल्य चार रुपये. ]

## प्रापंचिक सुखदुःखाचा समर्थ आविष्कार

सिद्धहस्त कथाकार **श्री. व. पु. काळे** यांचा 'वलय' हा नववा कथासंग्रह. या संग्रहात एकूण १२ कथांचा समावेश आहे आणि त्यापैकी सर्व प्रकाशित आहेत.आधीच विशेष गाजलेल्या ' स्वप्नवेडी ', ' अर्ध्यावर विरले गीत', ' लाट ' पिकुन वीज मी फुले फुलविली', 'वलय' इत्यादि कथांचाही त्यात समावेश आहे.

श्री. व. पु. काळे यांच्या कथाविश्वाचं वर्णन एकाच शब्दात करायचं झालं तर ते 'रसरशीत' या शब्दानं मी करीन.

कथा परिणामकारक व्हावी म्हणून कटाक्षानं पाळायचीं पथ्यं—म्हणजे पाल्हाळाचा अभाव, प्रत्यक्ष कथन व वर्णनं, गतिमान संवाद आणि कथानकाचा धावता ओघ—श्री. काळे जरूर पाळतात. त्यांच्या कथा दीर्घ नसतात असं नाही. त्यांच्या मला विशेष आवडलेल्या ' जिद्द', ' कैफ ' अशासारख्या कथा चांगल्याच दीर्घ आहेत. पण दीर्घ असूनही त्यांच्यात पाल्हाळाचा, पुनरुक्तीचा दोष पाहू गेले तरी सापडणार नाही हे विशेष आहे. वाचकांचा विरोध ( resistance ) वाढेल असं चुकूनही ते कथन करीत नाहीत. वाचक कथेबरोबर सहजपणे वाहात जातो हाच कथाकाराचा विशेष आहे.

प्रस्तुत संग्रहातील स्वप्नवेडी ही कथाच याचा जबरदस्त पुरावा आहे. कथेची सुरुवात होते तीच मुळी एक तरुण मुलगी धावती गाडी पकडते आहे या प्रसंगानं. मग तिची व लेखकाची वारंवार गाठभेट होते आणि वेगानं कथा पुढं सरकते. पहाता पहाता ती नायिका लेखकाला ( आणि वाचकानाही ) तिच्या ऑफिसच्या वातावरणात घेऊन जाते. एक मध्यमवर्गातील तरुण मुलगी, आपल्या वडिलांच्या संसारास हातभार लावण्यासाठी नोकरी करते आणि त्या प्रत्ययकारी वातावरणात लेखक एकदम गुंग होतो. या मुलीला खरं तर नोकरी नसते. पण नोकरीच्या विश्वातील सारी सुखःदुखं तिनं आत्मसात् केलेली आहेत आणि या चकव्याचं वेड फुटतं महिन्याच्या एक तारखेस—पगाराच्या दिवशी. पण पगार मिळाल्यानं नाटकही ही नायिका इतकं व्यवस्थित करते की तिच्याबरोबर आपणही आपली करमणूक करुन घ्यायला तयार होतो. स्वप्नवेडीचं ते स्वप्न आपणही आपल्या उराशी कवटाळून घेतो. एका धूसर, दुःखद पण तरीही उदात्त भावविश्वात लेखक आपल्याला अलगद नेऊन सोडतो.

या बारा कथांचे प्रकार मात्र अनेक आहेत. ' स्वप्नवेडी', ' लाट ' शेखर वर्गात बसला आहे' या वातावरणप्रधान व विमनस्कता वाढवणाऱ्या कथा, तर ' अर्ध्यावर विरले गीत ' आणि पिकुन वीज मी फुले फुलविली' या स्वभावचित्राचा ठळक उठाव दाखवणाऱ्या कथा, नरमादी ' सुख विकणे आहे अशा समस्याप्रधान कथा तर केवळ भावतरंग उठवून लांबून त्या तरंगाकडे एकाग्रपणे पहावयाला लावणाऱ्या 'वलय'सारख्या कथा विषयांचं वैविध्य वाढवतात तशा त्या लेखकाच्या भावविश्वाच्या मर्यादाही व्यापक करतात. परस्परविरोधी आणि हळुवार, सूक्ष्म अशा भावछटांवर वाचकांचं मन हेलकावत राहातं.

एखादं तीव्रतर रहस्यमय मानवी दुःख घेऊन त्याभोवती कथा गुंफायचं श्री. काळे यांचं कसब फार मोठं आहे. हा प्रयत्न फसला तर उथळपणा, ढोबळपणा किंवा भडकपणा कथेत शिरलाच म्हणून समजा. पण इथं तसं होत नाही. 'शेखर वर्गात बसला आहे ' या कथेत आपल्या बहिणीचा एक गोड छोकरा शाळेत येताना अपघाताने मरतो आणि त्या धक्क्यानं डासळलेलं तिचं मन ते मानायला तयार होत नाही, शेखर वर्गात आहेच असं मानतं—ही सारीच कथावस्तु फार दुःखजड आहे. पण कथेच्या अखेरीपर्यंत शेखरचा मृत्यू आपल्याला जाणवत नाही आणि शेवटी हा धक्का बसल्यावर एक फार मोठा एकाकीपणा

(पृष्ठ ५२ वर पहा)

(पान १० वरून—कादंबरी)

" काय बुद्धीभेद केला मी ?"

" तुमच्या बोलण्याला दुसरं काय म्हणायचं ?"

" तुम्ही कशाला भांडता आपापसात ? पुढचं काय करायचं ते विचारा तायबायला." वाटुळकरमामा म्हणाले.

" भक्तीण काय म्हणत्याय ?"

" देवाचो गुरु देवाघरी गेलो. " भक्तीण सांगून मोकळी झाली.

" ताय, तुला संशेय कुणाचा येतो ?"

" संशेय यायला मी बाहेर योडीच फिरत्याय ?"

" तरी पण —"

" गावात सफरी बोकाळल्यायत ना आज-काल ?"

"मलाही तसंच वाटतं. साले आफ्रिकेहून मर मर पैसा आणा-तात नि इकडे उंडारत बसतात ! मी म्हणतो, उंडारा ! आमच्या बापाचं काय गेलं ? पैसेपण तुमचे नि छकडेसुद्धा तुमचेच. पण आमच्या देवाधर्मावर तरी हात टाकू नका ! गायत्रीला देव मानतो आम्ही !"

"आता कसं रे करायचं बाबीशेटा ?" ताईने काकुळतीने विचा-रलं.

" अग तू काय डरत्येस ताय ! कोर्टात लढवतो मी हे प्रकर्ण ! बाबीशेटाला लेचापेचा समजू नकोस हं तू ! सगळी इष्टेट फुंकीन, पण गायत्रीचा वध करणाऱ्यांचं पेकाड मोडल्याशिवाय रहाणार नाय ! हां; तुळसकराची औलाद आहे ही !"

पण ऐकल्यावर ताईला आरपार भडभडून आलं. तेहत्तीस कोटी देवाना शरीरात निवारा देणाऱ्या त्या गायत्रीचे असंख्य गुण तिला आठवू लागले. भक्तिणीला ती वेणूच्या लीला वर्णन करून सांगू लागली. त्या पुराणाकडे पाठी वळवून मंडळी परत फिरली.

चंद्रावरचा काळा ढग दूर झाला होता. पिठुरकं चांदणं अंधार उजळत होतं. चंद्रासभोवार पडलेलं खळं मात्र कायम होतं. काळ्या भुतांच्या माळीसारखी दिसणारी झाडं निश्चल होती. वारं पडलं होतं.

"खळं पडलंय त्या अर्थी काहीतरी काळंबेरं होणार, हे मी जाणूनच होतो." परतताना वाटुळकरमामा म्हणाले.



" हे काळचावेऱ्याच्या पलीकडचं आहे. हा आपल्या धर्मावर घाला आहे." बाबीशेटांनी निर्वाळा दिला.

" ते पटतंय मला ; नि विशेषत: ताई देवधरनीसारख्या सावि-त्रीची गाय मारणं हे तर नि:संशय अघोर आहे. पण अगोदर ते सिद्ध झालं पाहिजे !" काकानी ठामपणे सांगितलं.

" सिद्ध कसं करायचं ? गायत्रीच्या सागुतीच्या वश्या तुमच्या पुढ्यात मांडून ठेवायच्या तायने ?" बाबीशेटानी आसूड मारला. "ते काही नाही. अगोदर उद्या राजापुरास जाऊन फिर्याद गुद-रतो सगळ्या मोहोल्लेवाल्यांवर, नि किराणा बंद करून टाकतो एकेकाचा. माजल्यायत वेटे !"

"बाबीशेट, तुम्ही आफ्रिकेवाल्याना नमवा. उरलेले पाच मिनिटात वाकतील."

" नुसते वाकतील ? त्याना पुरतो कबरस्थानात नि मग सांगा-यला येतो चिवाव्यात !"

बाबीशेट निश्चय घोटू लागले. रात्रभर ते जागे होते.

काका घरी आले. गडग्याला कोयंडा घातल्याची खात्री करून घेवून त्यांनी वळकटी सोडली.

"पाणी ठेवलंय उशाला. " काकू कुशी न वदलता म्हणाल्या. काकानी पाणी पिऊन अगस्तीला मनात गाऱ्हाणं घातलं.

" इतका उशीर कशाने झाला ?"

" ताई देवधरणीकडे वळलोवतो. गाय हरवल्याय तिची.

" ती वरी नाही हरवली स्वत: ?

" नवऱ्याच्या पाठीमागे एकटं उरलं, म्हणजे हे असलं अभद्र ऐकायची पाळी येते."

" चांगला नवरा शहरात राहातो म्हणत होता. पण हिलाच गाव हवं होतं. आता घे म्हणावं. गाव हवंय ना ?"

" इथे विस्कळ जागा, दारात पाणी, लागतील तितके तांदूळ, शिवाय वरखर्चाला नारळ आहेतच. हे सगळं सोडून ताई शहरात काय करणार होती ?"

" करणाऱ्याला सगळं करता येतंय. इच्छा पाहिजे."

" पण तो तिचा प्रश्न आहे."

" असं म्हटलं की संपलं ना सारं ?"

" तिचं प्रारब्ध काय आपण बदलायचंय ?"

" पण निदान आपलं तरी प्रारब्ध आपण बदलूया की. आज ताईची ही अवस्था आहे. उद्या माझी कशावरून होणार नाही तशी ?"

" तोपर्यंत काळ बदलेल."

" तुम्ही नुसती आशा करीत बसा, नि मी कणाकणाने मरत्ये."

" दुसरा काही विषय नाहीच का बोलायला ? की नेहमी मरणच उगाळलं पाहिजे ?"

"तुम्ही मुंबैला चला म्हणजे सगळं काही ठीक होतंय बघा."

परार्धं वेळा ऐकलेलं हे वाक्य काकानी कानाबाहेर टाकलं. त्यांच्या पुरतं त्याना पटलं होतं की सर्व अनर्थाच्या मुळाशी कारण एकच : आमचे तरणे पोरगे हे नंदनवन सोडून गिरणीचे उकीरडे फुंकायला मुंबईला गेले आणि परशुरामाची भूमि पोरकी झाली !

* *

## [ ३ ]

डोळा उघडल्याबरोबर बर्वेकाकांच्या मनाने थेट ताईच्या नारायणपाखाडीतल्या परसवात धाव घेतली. मनामागोमाग तेही गेले. त्यांच्यापुढे प्रश्न उभा राहिला. ताईना भेटावं की भिकूला ? त्यांनी भिकूलाच भेटायचं ठरवलं. सुपारीवागेत भिकू रहाटावर पाणी लाटत होता. काकांची चाहूल इतक्या भल्या सकाळी लागल्यावर तो चपापला.

भिको, खरं प्रकरण काय आहे ते स्पष्ट स्पष्ट सांगून टाक वावा." काका म्हणाले.

"आमची गाय कापलिनी.

"तू तिला केव्हा पाहिलंवतंस ?"

परवा सांजेला."

"कुठे ?"

"वर घाटवणावर."

"नंतर ?"

"नंतर तिचो पत्ताच नाय."

"मग कापलिनी— कापलिनी म्हणून बोंब मारतां ती कशावरून रे ?"

"आमचो दाट संशेय हाय."

"संशेय लाख असेल. खरा प्रकार काय आहे ?"

"तायला विचारलेलां वरां."

"तिला विचारल्याशिवाय रहाणाराय? पण तुझं म्हणणं काय आहे ?"

"गाय कापलिनी हेच खरां."

"आणि वाघानं पळवलंन नाही कशावरून ?"

"वाघ वर्षभर आलेला नाय."



"म्हणजे काय आता तो येणार नाही असं आहे ?"

"तुम्ही आपलां तायलाच विचारा."

"ते तू सांगायला नकोस. मला तुझ्याकडून माहिती हव्येय."

"आपुन काय सांगनार ?"

"कां ? राखण्या कोण आहे ? तूच ना ?"

"हो."

"मग नीट उत्तरं दे."

"मला उमगत नाय."

"वेश उमगेल. खायचं कसं उमगतं ? सांग, तू गाईचा शोध कुठे कुठे केलास?"

"वर घाटवणावर गेलेलो. तिथून कारशिग्याच्या घाटीवर. मग वापूंच्या घाटीवर. नंतर हे बंदरचे मळे नि वरल्या अंगाचं वाघवीळ."

"वर झऱ्याकडे ?"

गेलोवतो."

मग कुठेच काही मागमूस नाही लागला ?"

"अजिवात नाय."

मागे सदो नाखव्याचा रेडा पळवलावता वाघानं. आठवतंय ?"

"तिगस्ताची गोष्ट ती."

"त्याची हाडं कुठे मिळालीवती ?"

"झऱ्यावर."

"आपण तिथेच कसून झडती घेतली पाहिजे."

"मी पान् न् पान् धुंडाळलांय झऱ्यावरचां."

"हाडूकसुद्धा नाही दिसलं म्हणतोस ?"

"आयच्यान् !"

"वाघानं शेजारच्या गावात तर ओढून नेलंन नसेल नं ?"

"छ्या ! वाघाचां ठरलेलं हाय. गुरूं मारायचां नि झऱ्यावर नेऊन फाडायचां."

"आत्तापर्यंतचे सगळे दाखले असेच आहेत ?"

"सगली जनावरां झऱ्यावर गावलीवती."

"तातवा हरिश्चंद्रकराचं रेडकू कुठे मिळालं ?"

"वरमहृदयावर."

"ब्रम्हहृदयावर ना ? मग लपवून कां ठेवलंस ?"

"आठवलां नाय."

तायची गायत्री तिथे कशावरून नसेल ?"

"वरमहृदयावरलो झरो आटलो."

मान्य. पण राखण्या म्हणून ब्रम्हहृदयावर तू तपास कां केला नाहीस ?"

"तियलो पिंपळ वाईट हाय."

तुझ्या कोण मानगुटीवर बसणार होता ?"

"आपुन तिकडे जात नाय."

"बाकी सर्व ठिकाणं तपासून झाली ?"

"आयच्यान !"

"मग चल तू माझ्याबरोबर."

"कुठं ?"

"मसणात. चल म्हणतोय ना ? चल म्हणजे चल."

"तायला हांकारून इतो."

ताईंची परवानगी काढायला भिकू घरात गेला. खारकाळलेल्या ताई कमरेवर हात ठेवून वाहेर आल्या. त्यांचे डोळे सुजलेले दिसत होते. ताईनी विचारलं,

"आता कुठे नेताय ह्याला ?"

"ब्रम्हहृदयावर."

"तितक्या लांब गायला कोण नेतो ?"

"तातवा हरिश्चंद्रकराचं रेडकू कुठे मिळालंवतं ? ब्रम्हहृदयावरच ना ?"

रेडकू ओढायला हलकं पडतं वाघाला."

वाघाच्या ताकदीची कल्पना नाही तुला. हत्तीलासुद्धा स्वर्गात ओढत नेईल, असली औलाद असते ती."

"वरं ; बघा हो ! ताईन् वघू नका म्हटलंन् म्हणून न्हायलं असं व्हायला नको !"

"माझी खात्री आहे. धूड ब्रम्हहृदयावरच मिळेल."

"घ्या खात्री पटवून. नि भिक्या, पांढरी काठी ने. मागे फार्स केलावतास आठवण आहे ना ?"

"अग, काठी ग कशास हव्ये ? कोण वेताळ नि समंध उठतो तो बघतो मी."

" तुम्ही वघा. पण भिक्या, आपल्याला विषाची परीक्षा नको. तू पांढरी काठी घे नि जा. नि लवकर परत हो. नाहीतर माझा जीव आणखी टांगुळकीला लावून ठेवशील !"

घामाघूम होत काका आणि भिकू डोंगरमाथ्यावरल्या ब्रम्हहृदयावरं आले. डोंगरावर शंकराचं देऊळ आहे. जिथे अभिषेकाचं पाणी गोमुखातून देवळाच्या बाहेर जमिनीवर पडतं तिथे हृदयाच्या आकाराचा दगड वर्षोन्‌वर्षे पडलेला आहे. तेच ब्रम्हहृदय ! ब्रम्हहृदयाच्या वरच्या अंगाला घळीतून वाहाणारं पाणी निघतं. तळापासून ब्रम्हहृदयापर्यंत चढायचं म्हणजे माणसाला ब्रम्ह आठवतं. वरच्या झऱ्यातलं गारेगार पाणी प्यालं की मात्र जीव क्षणार्धात् शांत होतो. वाजूची झाडी सावलीला सज्ज असतेच.

" आधी वरच्या अंगाला जाऊया नि पाणी पिऊया."

" पन झरो आटलो तो."

" तू तुझ्या डोळ्यानं पाहीलायस ?"

" नायवा."

" मग चल तर. तुम्ही दुसऱ्याच्या शव्दावर विश्वास ठेवताय् आंधळेपणानं म्हणून अनर्थ होतोय् !"

" तुमी पुढे होवा."

" झालो ! आता झालं समाधान ?"

काका घळीजवळ आले. त्यानी कातळझरा शोधून पाहिला. पाणी कुठेच दिसेना.

" सुकलेला दिसतोय !" काका म्हणाले.

" मी खाली तळाशीच सांगितलावतां."

" पण प्रत्यक्ष डोळ्यानं पाहून खात्री करून घेतलीस नं आता ? त्यासारखं समाधान नाही."

मी घाटवणावरचां पान् न पान् धुंडलां."

" आता खात्री झाली."

" आता काय करायचां ?"

काल ऐकलंयस् ना ? वावीशेट कोर्टात जातोय."

" तो वुलला म्हणजे जाईलच."

" नि नाही गेला तर मी जाईन ! साले राजरोस भटाची गाय कापतात म्हणजे समजतात काय स्वतःला ?"

गाववाले चांगले हैत. पण सफरी भडकवतात त्येनला."

" एकच रे ते सगळे !"

काय करांयचां ते लवकर करायस हवां."

आजच ठरवतो. अनायासे गुरुवार आहे. दत्ताचा दिवस. दत्ताला प्रिय कामधेनू ! म्हणजे गाय कापलिनी त्याचा सूड उगवायला उत्तम दिवस ! खरं की नाही ?"

एका तंद्रीतच वर्वेकाका डोंगर उतरले. वावीशेटच्या दुकानाकडे न वळता ताईंच्या सुपारीबागेत शिरले. मागे भिकू होताच. त्याना पाहिल्यावरोवर ताई म्हणाल्या,

" फिटला संशेय ?"

" साफ फिटला. वाघानं तोंड लावलं असतं तर कुठे ना कुठे हडकं गावलीच असती."

" मग आता काय ?"

" थेट राजापूर !"

" शेवटपर्यंत झुंजवण्याची जवावदारी तुमची हो! नाही, आपलं अगोदरच सांगून ठेवत्ये. मी ही अशी सोवळ्यातली. मी कुठे कज्जे लढवू नि साकश्या देऊ ?"

पण कोर्टान् विचारलंन की वायो, तक्रार काय आहे ?"

" तर सांगेन, आमची गायत्री कापलिनी म्हणून !"

" तेवढंच पायजे मला."

ताईंचा ओटा सोडून काका तुळसकरांच्या पडवीकडे वळले. अंगणातूनच त्यानी पुकारा केला. उत्तर आलं,

" शेट दुकानावर गेल्यायत्."

" कां ? आज दुकानावरसे गेले ?"

" माल देवाला."

" अरे, पण निळू आहे ना ?"

" तो गेला."

" कोण निळू ? नि कुठे गेला ?"

" मुंवैला !"

" अरे काय सांगतां काय ?"

" खरंच."

" पण केव्हा गेला ?"

" आत्ता सकाळच्या लांचेनं."

" कां ?"

नोकरीसाठी. त्याच्या मावळ्यान् वोलावून घेतलान् त्येला." शब्दांचं तेजाव काकांच्या कानात घुसलं.

कुठे वोलला नाही तो ?"

" जन्मजात कारस्थानी तो ! तो काय दाद देतोय ?"

" म्हणजे ती मोहल्लेवाली मंडळी

गेल्या महिन्यात गाजलेल्या आणखी 'कॅराथॉन' स्पर्धा




ही एक सुरू न झालेली लॉटरी स्पर्धा

अनुक्रमणिका

कारस्थानं रचून आमच्या धर्मावर घाला घालतायत्, नि ही आमची तरणीताठी मंडळी आम्हाला एकवशी टाकून मुंबईला पळतायत् !" काका कमालीच्या निराशेने म्हणाले आणि माडाच्या शेंड्यापासून झाप तुटून पडावं तसे पडवीतल्या बाकड्यावर अवसान गळून कोसळले.

## [ ४ ]

दत्ताचं भजन संपलं. सर्वांनी अंगारा लावला. तीर्थ घेतलं. प्रसाद तोंडात टाकला. आणि जाता जाता एकदा दत्ताला पाया पडून मंडळी घरोघर निघून गेली. वर्वे-काका बाबीशेटना म्हणाले,

" आपण इथेच बसू या."

" कां बुवा ?"

" ते महत्त्वाचं बोलायचंय ना ?"

" त्याला आमची तुळसकरांची पडवी वर्ज्य केव्हापासून झाली ?"

" शिवाय भरीला आज बाबीशेटची कडक कॉफी पण आहे !" वाटुळकरमामानी आठवण करून दिली.

" घमेलं भरून देईन. पण आज विषय जरा वेगळा आहे."

" म्हणूनच म्हटलं तुळसकरांची पडवी आज नको. हे दत्तमंदीर झकास आहे. शिवाय, चांगल्या कामाला देवाची सोबत असलेली बरी."

"पण आजपर्यंत असं कुठचं बोलणं झालं की जे आमच्या पडवीवर झालं नाही ?"

"आजची गोष्ट वेगळी आहे. तिथे महंमदमास्तर तांबे आला तर गायत्री प्रकरणावर निर्णय घेता येईल ?"

"यवनाला भिता नि पायावर धोंडा मारून घेता."

"भीत नाही. पण व्यवहार पहावा लागतो."

" लागतो ना ? म्हणून म्हणतो, काका, आमच्या पडवीवर चला नि जे काय ठर-वायचंय ते सर्वांसमेक्ष ठरवा."

" ते वाईट दिसेल."



अनुक्रमणिका

" नि गाय कापलिनी ते चांगलं दिसलं ? चला निमूटपणी ! "

बारा पडावा तसं कांकाचं बोलणं थांबलं. ते बाबीशेटांच्या पडवीवर आले. वाटुळकर-मामानी पिशवीतून गंजिफाचे जोड बाहेर काढले.

" आज बिजिक नको."

" एकदम मान्य."

" मी ब्रम्हहृदयावर जाऊन आलो."

" ते दुपारीच कळलं."

" अरेऽऽच्या ! "

" तुम्ही तिकडे वळलात नि गिऱ्हाई-कानी बातमी आणली."

" इतक्या ह्यांच्या नजरा विलेक्षण ! "

पण गाय कापलिनी त्याची साक्ष द्यायला एकजण पुढे येईल तर हराम ! "

" साक्षींची गरज नाही. माझी बालंबाल खात्री झाल्येय."

" गूळखोबरंच वाटायला हवं ! "

" असं नाही. स्वतःच्या चक्षूनी पाहि-लेलं असलं म्हणजे मन साफ असतं. "

" बरं, आता काय करायचं ? "

' उघड आहे. राजापुराला कोर्ट लढ-वायचं."

" की त्यांना आपलं म्हणणं मांडायला चान्स द्यायचा ? "

" म्हणजे पुन्हा लोटांगणं घाला ! अरे, मी म्हणतो हे इतकं ओशाळेपण कशा-साठी ? "

"ओशाळेपणाची वार्ता कशास करता ? "

" तुम्हीच चान्स देण्याची गोष्ट काढ-लीत."

" शब्द मागे घेतले ! बस्स ? "

" राजापुरचं कोर्ट गाठायचं हे नक्की ठरवलंत ? "

" आता काय शिंगं बाकी राहील्या-यत ? "

" नंतर तुम्हीच म्हणाल गावकी बोला-वली असती तर बरं झालं असतं. वाटल्यास नारायण पाखाडी, भैरव पाखाडी, विष्णु पाखाडी, अशी दवंडी पिटू या."

"बाबीशेट आता कृपा करा नि नारायण पाखाडी, भैरव पाखाडी, असली फुटीची भाषा बोलू नका. गायत्री काय फक्त ब्राम्ह-णांची होती ? की सोनारांची होती ? आपण सगळे हिंदू एकीने निर्णय घेऊया."

हे कोकण आहे—विसरू नका."

" मग असेच फाटाफुटीत मरा ! "

" मरणाच्या गोष्टी कशाला काढताय काका ? आपली जीत न्हायच्याय राजा-पुरास."

तथास्तु ! "

" नुसत्या आशीर्वादाने नाही भागायचं. पिशव्या सैल कराव्या लागतील."

" करू ! हा बाबीशेट धर्मरक्षणाच्या बाबतीत पाऊल मागे नाही घेणार. मग बेहत्तर इस्टेट खपली तरी ! शिवाय देव-धरणीला शब्द दिलाय मी."

"इस्टेट कशाने खपणाराय ? हरिश्चंद्र-कर वकील पंचवीस रुपयात कोर्ट झुंजवेल. आपल्या गावचा माणूस आहे तो."

काका, तुम्ही लक्ष घालणार पूर्णा-शानं ? "

" शंभर हिश्शानं."

" पहा हो — नंतर अर्ध्या प्रवाहातनं मागं नाही फिरता येणार."

" हिटलरसारखी मुसंडी मारतो. मग तर झालं ? "

" बरी आठवण झाली—आज हिट-लरने खुद्द लंडनवर बॉम्ब टाकलान् म्हणे ! ' केसरी 'च म्हणतोय."

" वाटुळकरमामा, आता फाटे फोडू नका बुवा ! "

" नाही, ' केसरी'त वाचलं ते सांगि-तलं."

" तुम्हाला काय वाटलं, आम्ही हिट-लरच्या बातम्या वाचत नाही ?—पण आज विषय आहे गायत्रीवधाचा."

"तेही खरंच."

तुळसकरांच्या पडवीवर सर्वांसाठी पितळेच्या पेल्यांमधून कॉफी आली. सर्वांचं कॉफीपान झाल्यावर काका म्हणाले,

" आपला निर्णय आता पक्का झाला. एका बाजूने पोलीसांकडे तक्रार नोंदवायची नि दुसरीकडून हरिश्चंद्रकर वकीलातर्फे कर्दिले मोहल्लेवाल्यांवर फिर्याद गुदरा-यची."

" पंचवीस रुपयांसाठी वाटल्यास रुपया —रुपया पट्टी बसवू या."

" आमची तुळसकरांची गायत्री गेली असं समजतो मी. पट्टी-विट्टी काही नाही. हे घ्या माझे पंचवीस रुपये नि वकिलाला सांगा काका, की पैशांकडे बघून केस लढवू नकोस. हा धर्मासाठी लढा आहे. केस जिंक. तुझ्या घरावर सोन्याची कौलं घालू

कवज्याच्या आतल्या कप्प्यातून बाबी-शेटने काढलेल्या तेलकट नोटा न मोजता वर्वेकाकानी स्वतःजवळ घेतल्या आणि तुळसकरांच्या पडवीवरची बैठक बिजिक न खेळताच संपली. चांदण्याने भरलेल्या

अंगणाच्या कडेला उभं राहून काका सर्वांना उद्देशून म्हणाले,

" बावीशेटचे हे रुपये कज्जापोटी खर्च होणार नाहीत. हरिश्चंद्रकर वकीलाला धर्माच्या नावाखातर मोफतात उभा करेन, तरच मी खरा ! नि कज्जा जिंकला की ह्या पैशांचाच गावाला सत्यनारायण करू– बावीशेटचे पैसे देवाच्या कारणी लावू !"

ह्याला नाही कोण म्हणणार होतं ?

" कोर्ट लढवायचं ठरलं. " अगस्तीला गाऱ्हाणं घालून झाल्यावर काकानी पडता पडता काकूना सांगितलं.

" वाटलंच मला. कुणाचं डोकं हे ?"

" माझं."



रास्तच आहे. असल्या विकतच्या श्राद्धाची हौस दुसऱ्या कुणाला असणार ?"

" ब्राम्हणाची गाय कापली जाते हे सहन करायचं ? आणि तेसुद्धा ब्राम्हणानी ?"

"ते नका सहन करू–नि एका बाईची जन्मभर कुचंबणा होत्येय तिकडे दुर्लक्ष करा ?"

" तुझे आपले पहिले पाढे पंचावन्न."

" कां नसतील ? मनं नाहीत आम्हाला.

" आणखी पाच वर्षांनी विचार मला. ह्याच भूमीला नंदनवन म्हणशील तू !"

"पाच वर्षं मी जगेनसं वाटतं की काय तुम्हाला ?"

" आता कृपा कर नि असलं अभद्र बोलू नकोस झोपायच्या वेळी."

काकू फुणफुणून हुंदके देऊ लागल्या. त्याना सरावलेल्या काकांचा वाऱ्याची एक झुळूक येताच डोळा लागला.

## [ ५ ]

जुम्मा उजाडला. सकाळच्या बांगेने कर्दिले मोहल्ल्याला जाग आली. महंमद-मास्तर जागे झाले. प्रथम त्यानी टोपली-खालच्या कोंबड्याना उकीरडे चरायला सोडून दिलं. मग मागल्या दारच्या बावडी-वर चुळा मारून त्यानी काचेच्या ग्लासा-तून चहा घेतला. विडी संपवली आणि लुंगी घट्ट करून ते मशिदीत आले. वझु उरकून नमाज पडले. नमाज पडल्यावर त्याना तर-तरीत वाटलं. ते घराकडे परत वळणार इतक्यात त्याना मशिदीकडे चाललेला सुले-मान दालदी भेटला. त्याने महंमदमास्त-राना चिंचेच्या सावलीत सरकवून त्याने विचारलं,

बावीशेटानं काय झेंगट कारलान हां ?"

" तुमला कुनी सांगितला ?"

" सगला मोअल्ला तेच बात करतु होता काल रात."

" मंग अमचे कानावर नाय आयले ते ?"

" ते तुमीं जानो के मोअल्लेवाले जानो."

" ते मालूम है. पन अपुलेत एकी पायजे."

" ते आता वरां सुचलां !"

" वखत लै कठीन आला."

" मिनी तेच विचारलां, तर तुमी पंच-नामा कारलात !"

" भटनीची गाय खंय गेली असेल ?"

" ते गाय जानो ना गुराकी जानो."

" पन ते मनतात सफरीवाल्यानी खतम् केलीन."

"डोचकी फिरली त्यानची ! दुसरां काय?"

" त्याना पटवशाल ?"

" तर ! का बावीशेट पोर हाय ? का काका पोर हाय ?"

" पन ते पोलीसात चालले."

" आनि मसनात का जायनात ! कर नाय मग डर कसाची ?"

" एका गावात रावचे नि कज्जे करा-वचे काय खरां नाय."

" हे हिंदुना कसे नाय पटे ?"

" कारन गाय त्येंची हाय."

" पण त्यानी शोध तरी घेतलाव काय ? गुरवीन काय बुलली ? गुरू गेलांव म्हनते ?"

" आता पंचनामा कसा घेता ?"

सुचलां ते विचारलांव. पंचनामा कसचो त्यात ?"

" मला वाटतां, अपुन समदे बाबीशेटला मिलुंया."

" बावीशेट एवरा कोण झाला मोट्टा ? एवरा मोट्टा हिटलर, त्याला पन ब्रिटीश भेटे नाय नि बाबीशेट फालतु पाला, त्याला मिलायला समदा कर्दिले मोअल्ला जम-नार !"

लानमोट्टेची बात नाय सुलेमान. राजापुरापर्यंत दिंड निगायला नकु मुसले-मानांची."

" एका परीस खरां हाय ते."

" आजपर्यंत असा कदी घंरलावतां ?"

" नाय बा."

"मुसलेमानांनी कदी त्येंची गोरवे मार-लीवती ? सागुती केलीवती ?"

" छया ! अबुबकरच्या बेटीची शादी झाली तवां हजार मानुस जमलां. बारा बक-रींची कुर्बानी केली. पन गायला हात नाय लावलां."

"हेच वात काकांला सांगुया. कैसे ?"

खरां. पन अपुन पुराकार कसा घेनार ? मोअल्लेवाले झिगझिग करनार."

"त्येंची कालजी नकु. पुराकार नाय घेतला तरी पॅन मोअल्लेवाले झिगझिगच करनार. त्येंची रीतच हाय ती. मागे परसोद्याला मामलेदार आले हुते, ने पुराकार घेऊन अमी तेनला मिललुं नाय तर मोअल्लेवालेबी आमचा काय पन सिल्लक ठेवलां नाय !"

"ते पन खरां !"

"तू हे पन खरां बोलतूस, ने ते पन खरां बोलतूस !"

ह्यावर सुलेमान दालदी मनापासून हसला. म्हणाला,

"तुमचा बोलनाच तसां हाय. निंवार तर निंवार, ने चांदनी तर चांदनी !"

"मंग कवा निगनार ?"

"अगुदर अपुन अबुवकरला मिलुंया. मजबूत पारटी हाय तो. वखत आली तर पैसाबी तो खरचेल."

"तुमी पैसेलाच भालणार ! पन, म्हनतूस तर जांवयां. माजी ना नाय."

"तुमी विडी ओरा. मी वझु करून नमाजी करतो. पाच मिनिटां लागतील."

सुलेमान दालदी नमाज पडायला मशिदीत गेला. बाहेर निंवाच्या सावलीत महंमदमास्तर विडी फुंकू लागले. सफेत चुन्याचे खवले निघालेली जुनाट मशीद कर्दिले मोहल्ल्यात मध्यभागी होती. समोर वाजारपेठेचा रस्ता होता. वाजारपेठ म्हणजे एक तेलाची घाणी, एक किराण्याचं गावठी दुकान, एक न्हाव्याचं छप्पर आणि एक चहा–चिवड्याची पडवी. वाजारपेठेच्या उजव्या अंगाला नारळी-पोफळीची गार सावलीची वाग होती. अबुवकर हा ह्या बागेचा मालक. सफरीना पैसे चारून, सिंगापुरी माडे आणून त्याने आपले उत्पन्न वर्षाकाठी हजार बाराशापर्यंत रेटून अख्ख्या चिंबाव्याला चकित केलं होतं.

निंबाच्या सावलीत उभे राहून महंमदमास्तर अबुबकरच्या हिरव्याजर्द वैभवाकडे पहात होते. दहा मिनिटं गेल्यावर नमाज संपवून सुलेमान दालदी महंमदमास्तरांना भेटला. दोघेजण नंतर अबुवकरच्या बागेत आले.

त्याना येताना पाहिल्यावर अबुवकरने त्यांच्याकडे दुर्लक्ष केलं. तो आपली वाग पाहू लागला. महंमदमास्तरानी सुरुवात केली,

"आदवअर्ज."

"आदवअर्जं. आज सुवेचे तुमी कैसे ?"

अमी नमाजीला मिललो. म्हटलां शेटलोकला मिलूंया."

"काय स्पेशल–विशल कारलांव ?"

"मामला थोडा नाजुक होतां."

"भटनीच्या गुरवाचो तर नाय ?"

"वरोवर ओलखलांव."

बावीशेट राजापुरास जातांव. तुमची खबर काय वेगली हाय ?"

"वेगली कसची ? पन असां घरतां कामां नाय."

"घरेना ! डरता कशानं ?"

ऐसा कधी झालां नाय आपल्या गावात."

"मंग अता होऊ द्या तर. काफराना धरा तरी शिकवू !"

"जल्ले अमी धरा शिकवनार ! अमी मानसं तरी किती ? पाच, नाय तर दस."

"मुंवयवाले सगले मेले ? चपलूनवालेबी मेले ? संगमेश्वरवाले––"

"पन ही चिंबाव्याची भानगर हाये. दुनियेचा काम काय ?"

"तुमी असां बोलतांव म्हनून अमी मार खात आलांव. अपुन हे देशचे नवाब हांव. अठसो साल राज्य केलांव अपुन. पन तुमी ते विसरले. अता रडा !"

"अपुन अपले गाव पुरतां बोललांव. नवाब कोन, ने बादशहा कोन ते उलेमा बगेल."

"उलेमा बावरी खंनार ने तुमी पानी पिनार ! मंग मरा."

"तुमचां म्हनना तरी काय कलुं द्या."

"आमचां म्हनना काय असनार ? दोन हात होवून जाऊंद्यात."

"तेचात नुसकान कुनाचा होनार आमचा !"

"भटनीची गुरवां तुमी खाल्ली ?"

"अमी कशास खानार ? मुरग्या काय मेल्या ? वकरे खपले ? ने चोरी काय अमी करतो ?"

"मग डरतांव कशास ?"

"इज्जतचा सवाल हैं ना !"

"काफीर तुमची इज्जत जानतात ? खुले के काय तुमी पन ?'

"तंवा अता तुमीच पुराकार घेवा ने बावीशेटला समदा समजून सांगा. तेच वेश होनार."

"कां ? अबुवकर इथे हजामी करतो ? तेनला गरज असेल तर येतील. तुमी पन बरे मास्तर उंटावरून वकरी हाकतांव !"

"नाय, तुमचे शब्दाला मान हाय म्हनून बोललांव."

"चार दांडे धोपटले तर पाया परतील."

"म्हंजे तुमी तर दंगेची भाषा करतांव."

"करतांव म्हंजे ? हिम्मत हाय म्हनून करतांव."

"दंगे आमला भारी परतील हो !"

"मंग मरा."

"शेट निस्कारन गरम झायले."

"मी कैसे गरम झायलो ? पन मझवची आफत तुमला दिसे नाय तेचां राग येतो. सांगून सांगून उलेमा थकले !"

"गोडीगुलाबीनी जमतां काय अमी बघतु."

"बगा बापरे. सांगायचा काम अपुन केलांव. कुराडीचां काम कुराडीनंच झायलां पायजे."

कुऱ्हाडीची भाषा निघाल्यावर महंमदमास्तरानी पाय काढता घेतला. अबुवकरच्या बागेतून माना खाली घालून परतताना सुलेमान दालदी मास्तराना म्हणाला,

(पृष्ठ ६५ वर)






(पान ४३ वरून–ऐसी अक्षरें...)

जाणवतो. मग वर्गात नसलेल्या शेखरची बाहेर वाट पहाणारी त्याची ही मावशी, नसलेल्या शेखरला खाली उभी करून वर येणारी मावशी, या प्रत्येक प्रसंगातला नसलेला शेखर––म्हणजे मृत्यूची एक भयानक पोकळी––कथा वाचून संपल्यावर मनावर फार गंभीर परिणाम करते! या कथेतील फार मोठी गोष्ट आहे ती ही की शेखरचा तसा मृत्यू झालेला असूनही त्याची ती मावशी –– निवेदक –– ओक्साबोक्शी दुःख करीत नाही किंवा सहानुभूतीची भीक मागत ऊर बडवत हिंडत नाही. तिच्या दुःखाची जात फार वेगळी आहे. इतकी की ते तिचं एकटीचं दुःख उरतच नाही. ते मानवी दुःख होतं. आणि तो शेखरचा मृत्यू राहात नसून फक्त 'मृत्यू' राहातो! काळस असा की अटळ मृत्यू पचवणं, त्याशी तडजोड करणं हीच माणसाची केविलवाणी धडपड आहे हे निखळ सत्य फार ढळढळीतपणे समोर उभं ठाकतं! त्याकडे पहाणं भयानक ठरतं!

या उलट ' अर्घ्यावर विरले गीत ' व 'पिऊन वीज मी '–या कथांतील मानवी नाटच मन चक्रावून जाते. एका क्षयी मुलीचं मन जाणून घेतल्यानं तिच्या प्रेमात पडलेला नायक, ठरवून, योजना करून, तिच्याशी लग्न करतो. एक वर्षभर तिच्या प्रकृतीची काळजी घ्यावी म्हणून जगावेगळ्या निग्रहानं वागतो आणि सुखाचा घड ऐन टपकण्याच्या क्षणी त्याचाच अपघाती मृत्यू होतो ही कथा! नव्हे या घटना–कथा आहे ती मागे उरलेल्या त्या भावकोमल मुलीच्या मनोव्यथेची! ' पिऊन वीज मी–' या कथेची अतिशय सुंदर, तरुण, आकर्षक, रसरशीत प्रकृतीची नायिका ' कॅन्सर ' झाला असल्यानं किती वखवखलेल्या मनानं जीवन जगते आणि वाटलं तेव्हा शांतपणे व उत्कटतेनं मृत्यूला मिठी मारते–– ! दोन फार उत्कृष्ट स्वभावचित्रं लेखकानं सादर केली आहेत.

' विश्वास ', ' हातमोजा ', ' दिशाभूल', या कथात मनुष्यस्वभावाच्या अशाच एकेका वैशिष्टयावर लेखकानं बोट ठेवून कथा रंगवल्या आहेत. पण ' वलय' कथेचा उल्लेख मात्र निराळा करावा लागेल. संग्रहाचं नाव या कथेवरून आलं म्हणून काही ती कथा श्रेष्ठ ठरत नाही. या कथेत जिच्यावरोवर नाटकाच्या अनेक तालमी केल्यानं व प्रयोग झाल्यानं नायकाचं मन जिच्याशी एकजीव झालं होतं ती साथी संच सोडून गेली व तिच्या जागी नगास नग म्हणून दुसरी कुणी उभी राहिली––या घटनेनं एका प्रयोगारंभी नायकाच्या मनात कसली वलयं, वादळं उठली त्याचं वर्णन लेखक करतो आहे. खरं तर हा विषय व अनुभव अगदी नवा नाही. यावर लिहिलं गेलं आहे. पण ते असो. तक्रार ती नाही. तक्रार ही आहे की नायकाच्या त्या अत्युत्कट अनुभवाचं तसंच उत्कट निरूपण साधलेलं नाही. ( अनेक वेळा खुद्द लेखकाचा फार उत्कट प्रत्यक्ष अनुभव वर्णन करताना ही अडचण भासते. बौद्धिक अनुभूतीचं चित्रण जितक्या तटस्थपणे करता येतं तितक्या ताटस्थ्यानं प्रत्यक्ष भोगलेल्या अनुभूतीचं करता येत नाही. तिथं उत्कटता जमेसच धरली जाते. आणि मग तो अनुभव फिका वठतो! ) या कथेत प्रथम दीर्घकाळ एकंदर नाटचविश्वावरच लेखक लिहू इच्छित आहे असं भासतं. बऱ्याच वेळानं मग तो आपल्या दीर्घकालीन सहचरी नायिकेच्या सहवासाकडे वळतो व शेवटी शेवटी "ती आता नाही आणि नगास नग दुसरी कोणी आहे " तरी नाटकाचं काहीच अडत नाही पण त्याचा मात्र आत्माच हरपला आहे–– या अनुभूतीवर 'फोकस' साधतो. मतभेदाचा विषय होईल खरा,पण मला तरी हा 'फोकस' परिणामकारक वाटला नाही. ढोबळच वाटला.

श्री. व. पु. काळे हे एक चांगले कथाकथन करणारे लेखक आहेत. भाषेत ओघ येण्यास त्यांची उत्कृष्ट कथनशैली त्यांच्या उपयोगी पडत असलीच पाहिजे.

त्याशिवाय लेखकाचं कसब स्पष्टपणे दिसतं ते कालगती दाखवताना तो जी वर्णनं लिहितो तेव्हा. विलक्षण वेग व कथानकाचा ओघ अशा वेळी साधला जातो. ' स्वप्नवेडी,' ' लाट ' वगैरे कथा या दृष्टीनं मुद्दाम अभ्यासाव्या. त्याच कारणासाठी कित्येक कथांचा आरंभ व शेवटही जरूर पहावा. (हातमोजा, वलय, विश्वास, शेखर, इ.) सतारीचं द्रवत्व या कथनशैलीत आहे.

—मधुकर

( वलय – लेखक : श्री. व. पु. काळे, प्रकाशक भारतीय ग्रंथभवन, मुंबई १४ किंमत ५ रुपये, पृष्ठे १८६. )





अनुक्रमणिका






# महाकवि यशवंत

**"जगातली कुठलीही लौकिक शक्ती कलावंताचा पराभव करू शकत नाही"** असं नेहमी म्हटलं जातं. त्याचा प्रत्यय देणारे अनेक कलाकार जगात होऊन गेले व आजही विद्यमान आहेत. लौकिक प्रतिकूलतेवर मात करण्याचे वज्र सामर्थ्य सुकोमल कला त्या त्या कलाकाराला देऊन जातात आणि सामान्य ( वाटणारा ) कलाकार हा अनेक चमत्कार करून जातो. कवि यशवंतांच्या जीवनाचा आणि साहित्याचा मागोवा घेतला तर ह्याच अनुभव सत्याचा साक्षात्कार होतो. जे जे प्रतिकूल आपण नुसते कल्पनेने डोळ्यापुढे वा मनापुढे आणू शकू ते ते सारे प्रतिकूल यशवंतांवर चाल करून आले. पण हा पोलादी शरीरयष्टीचा आणि सुकोमल मनाचा कवि– कलाकार खचला-पिचला नाही. क्वचित अपघाताने ( पुरंदरच्या ) शरीर पिचले, पण मनाची उमेद आणि प्रतिभेचे उन्मेष वहरतच राहिले आणि म्हणूनच सतत पन्नास वर्षे "यशवंत" हे नाव महाराष्ट्रात 'यशवंत'च राहिले आहे. यशवंतांच्या आधीचे, बरोबरचे व नंतरचेही अनेक कवि थकले–थांबले. पण 'यशवंत' हे नाव व ते नाम धारण करणारा 'कवि' थकला नाही. नवे नवे उन्मेष दाखवीतच राहिला. यशवंतांचे 'लौकिक" जीवन आणि 'काव्य' जीवन यांच्यात सतत संघर्ष होतच राहिला –"प्रतिकूल तेच घडेल" असे म्हणत म्हणत व पहातच यशवंतांमधला कवि सतत आघात झेलीतच राहिला व काव्याचे मळे फुलवीतच राहिला. कवि केशवसुतांनी एका कवितेत कवीचा गौरव करताना असे म्हटले आहे की,

> श्वासोच्छ्वास करी परी नवल हे — जीवित्वसंहारक
> वायू घेउनि आत, तो त्यजितसे वायूस त्या पोषक.

केशवसुतांनी ही कविता १८९१ साली लिहिली. परंतु अशा तऱ्हेचा एक 'नीलकंठ' यशवंत दिनकर पेंढरकर ह्या नावाने महाराष्ट्रात कवि म्हणून ह्या ओळींचा जणु प्रत्यय देण्यासाठी अवतरणार आहे ह्याची त्यांना कल्पनाही नसेल. पण जीवनातल्या प्रतिकूलतेचे सारे वीष यशवंतांनी सतत पचविले. पण आपली कलासक्त व सौंदर्याचा वेध घेत जाणारी वृत्ती कधी कोमेजू दिली नाही. कुटुंब हसरे रहावे; कुटुंबातल्या साऱ्या माणसांना सुशिक्षण मिळावे; त्यांनी सतत नव्या नव्या स्वप्नांवर स्वार व्हावे ह्या भावनेने ते सतत "सॅपर्स अॅण्ड मायनर्स"चीच भूमिका घेऊन वागत राहिले. आणि हे करताना कटुता वा उपकार ह्या भावनेचा वासही त्यांना स्पर्शू शकला नाही हे त्यांचे अंगभूत मोठेपण. बरोबर पन्नास वर्षे ते काव्यलेखन करीत आहेत. ही साधना वाटते तेवढी सोपी नाही. पन्नास वर्षे ही स्फुटकाव्य साधना अविरत चालू आहेच. पण त्यांनी जयमङ्गला, बंदीशाळा, काव्यकिरीट ह्या खंडकाव्यांच्या द्वारे 'प्रदीर्घ' काव्यरचनेचा जो प्रत्यय दिला होता त्याच्यावर सुंदर शिरपेच "छत्रपती शिवराय" ह्या महाकाव्याने त्यांनी अलिकडेच चढविलेला पाहिल्यानंतर



'कॉन्टिनेंटल'चे अनंतराव कुलकर्णी, ना. यशवंतराव चव्हाण व महाकवि यशवंत

मन स्तिमितही होते आणि नतही होते. काव्याच्या वाटचालीत काही गुलाब आहेत, काही मोगरा, जाई–जुई, निशिगन्ध तर काही रानफुलेही आहेत. ह्याची जाण त्यानाही असेल असे मी मानतो. पण त्या मागले काव्यात्म मन, निर्धार, जिद्द, धडपड आणि काव्यविषयक श्रद्धा मला सर्वात महत्त्वाची वाटते. 'रविकिरण मंडळ' आता लौकिक अर्थाने अस्तंगत झाल्याला बरीच वर्षे लोटली. पण "छत्रपती शिवराय" हे रविकिरण मंडळाचे "बावन्नावे पुष्प आहे ( व तसे ते पुस्तकात नमूद केले गेले आहे ) हे वाचत असताना काव्याच्या क्षेत्रात केवळ काव्यविषयक सुजाण प्रयोग व प्रेरणांचा वारसा ठेवून जाणाऱ्या त्या मंडळाची स्मृति जागृत होते. व यशवंतांच्या तद्विषयक श्रद्धाळू वृत्तीने मनाला आल्हाद होतो. प्रस्तुत काव्य निर्मितीमागला इतिहास विनीतभावाने यशवंतांनी सांगितला आहे. मर्ढेकर, स. गो. बर्वे यांच्या आठवणी मनाला हलवून सोडणाऱ्या आहेत. पण "हे महाकाव्य व्हावे असा आग्रह त्यांनी यशवंतांबाबत धरावा ह्यातच सारे काही आले. 'शिवचरित्र' हा






अनुक्रमणिका



## अभिनंदन

'दीपावली' चे प्रथमपासूनचे एक 'सक्रिय' साथीदार–व हितचिंतक, नाशिकचे एक सुविख्यात व तरुण विडी कारखानदार **देवकिसन बस्तीराम सारडा** ह्यांची महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्सचे १९६८–६९ चे अध्यक्ष म्हणून अविरोध निवड झाली आहे. ह्या निवडीबद्दल दीपावली त्यांचे अभिनंदन करते. देवकिसन सारडा हे नुसते कारखानदार नाहीत तर औद्योगिक, सामाजिक व शैक्षणिक क्षेत्रातल्या विविध कार्यात 'सक्रिय' भाग घेणारे क्रियाशील कार्यकर्ते आहेत. संपत्ति आणि सेवा यांचे गोत्र एक नाही असे मानले जाते. पण देवकिसन ह्या समजाला अपवादभूत आहेत. अनेक शैक्षणिक कार्यात ते अग्रेसर आहेत. नाशिक शिक्षण प्रसारक मंडळीच्या ज्युबिलीच्या संदर्भात सारडाशेट घरोघर हिंडले. स्वीकारलेले कोणतेही काम कधी लहान असत नाही ह्या श्रद्धेने काम करणारे ते गृहस्थ असल्याने त्यांची ही निवड संयुक्तिक वाटते. चेंबरचे सर्वात तरुण अध्यक्ष म्हणवून घेण्याचा बहुमान त्यांना लाभला आहे तो मात्र त्यांच्या क्रियाशील व सेवाभावी वृत्तीमुळेच. दीपावलीचे व त्यांचे नाते तर गेल्या कित्येक वर्षांचे आहे. दीपावलीला ही वार्ता त्यामुळे अधिक आनंददायी वाटते.

'दीपावली' सारडाशेटचे अभिनंदन करते व त्यांचे क्रियाशील व्यक्तित्व 'चेंबर'मध्येही कांही क्रांतिकारक बदल घडवून आणील अशी आशा व्यक्त करते.

---

महाकाव्याचाच विषय आहे. ते घडले नव्हते इतकेच. यशवंतांजवळ श्रद्धाही होती व कविताही होती म्हणूनच हे घडू शकले. ते घडले. प्रकाशनाला 'यशवंत' (राव चव्हाण) लाभले आणि प्रकाशक म्हणूनही त्या क्षेत्रात नामवंत, यशवंत झालेले 'कॉन्टिनेंटल प्रकाशनचे अनंतराव कुलकर्णी लाभले हा सुरेख संगमच म्हणावा लागेल. हा ग्रंथ पाहिल्यानंतर व त्याची निमिती पाहिल्यानंतर 'जिद्दी' यशवंतांप्रमाणे जिद्दी व हौशी प्रकाशक कसा असू शकतो ह्याचा प्रत्यय येतो. येवढा प्रचंड खटाटोप साक्षेपाने स्वीकारून तो यशस्वी (दृष्ट लागण्याइतपत) करून दाखविणारे अनंतराव कुलकर्णी हेही श्रद्धेचा मोठा वारसा घेऊन आले आहेत असेच म्हणावे लागते. 'शिवराय' महाकाव्याचा प्रकाशन सोहळा महाकाव्याला शोभेसा, नेत्रदीपक व प्रेरक असाच झाला. ह्या तिहेरी—युतीमुळे (दोन यशवंत व एक अनंत) हे मंगल घडले. यशवंत हे महाराष्ट्राचे 'भूषण' ठरले. (अनेक अर्थांनी). व. मो. पुरंदरे ह्यांनी काव्यात्म गद्य लिहून *शिवचरित्र घरोघरी पोहचविले. यशवंतांनी मराठी साहित्याच्या इतिहासात पाचशे पृष्ठांचे मराठीतले पहिलेच प्रचंड महाकाव्य लिहून एक नवा इतिहास घडविला आहे. यशवंत द्वय व अनंतराव कुलकर्णी ह्या तिघांचेही ह्या महाकाव्याच्या निमित्ताने मी अभिनंदन करतो.

## गानतपस्विनी मोगूबाई

प्रत्येक कला साधकाकडून तपःश्चर्येची मागणी करीत असते. तपाची जिद्द, श्रद्धा, धीर आणि तपःश्चर्येसाठी लागणारी कष्ट करण्याची तयारी ही ज्यांच्या जवळ असते तेच लोक कलातपस्वी ठरतात आणि तपाने लाभणाऱ्या लौकिक–अलौकिक सिद्धी त्यांच्या पायाशी चालत येतात. त्या सिद्धी जे पायाशीच ठेवतात, त्यांना डोक्यावर घेत नाहीत वा वसूही देत नाहीत अशी माणसे खऱ्या अर्थाने तपस्वी ठरतात. संगीत क्षेत्रात आपल्या साधनेने तपस्विनी ठरलेले जे गायक–गायिका आहेत त्यांच्यात '**मोगूबाई कुर्डीकर**' हे नाव आवर्जून घ्यावेच लागेल. संगीताची कला ही तशी खटचाळ कला. पण ती प्रसन्न झाली तर अवघे सूर त्या कलाकारावर निछावर होतात. तो गायक जणु सुवर्णस्पर्शितच होऊन जातो. मोगूबाईंची गान तपस्या अशी सुवर्णस्पर्शित झालेली आहे असे म्हटले तर त्यात काही अतिशयोक्ति केली असा आरोप निदान जाणकार रसिक तरी खासच करणार नाहीत. आणि ती अतिशयोक्ति नाही ह्याची पावतीच जणु संगीत– कला अकादमीने नुकतीच दिली आहे. अभिजात हिंदुस्तानी संगीतातील श्रेष्ठत्वाचा मान अकादमीने त्यांना बहाल केला आहे. रसिकमनाने मोगूबाईंना हा मान कधीच देऊन टाकला होता. तो मान वय व गायकीतल्या 'सीनियॉरिटी'वर मिळत नाही. तो मिळतो सुरांच्या श्रेष्ठत्वाने मोगूबाई गेली तीन तपे गात आहेत. नावाची शान राखून गात आहेत. ही साधना सत्वशीलतेतून व सोशिकपणातून आलेली आहे. अल्लादिया खाँसाहेब व त्यांचे बंधु हैदरखाँ यांची प्रदीर्घ तालीम, अखंड रियाझ आणि त्या साधनेसाठी घ्यावे लागणारे कष्ट ह्यातून ही संगीत साधना घडली आणि रसिकांनी पसंतीची दादही दिली. पण अलिकडे त्यांनी बैठकीचे गाणे सोडल्यासारखे झाले होते. 'लौकिकाचा' मोह सुटल्याशिवाय अलौकिकाचे लेणे लाभत नाही असा तर त्या मागचा हेतु नसेल? मोगूबाईंचे गाणे नुसते सुरेल नाही तर ते वजनदार आहे. रियाझ व कल्पकता यातून ते विकसित होत आले आहे. नवे नवे उन्मेष दाखविणारे आहे. त्यामुळेच त्यांची बैठक नेहमी नवनवोन्मेषशाली असते. सतत 'फ्रेश' असते. काळजाला कुठेतरी हळुवार स्पर्श करून जाणारी असते. त्यांची बैठक म्हणजे अनेक गोड व सुखद धक्के देणारी बैठक! नवे 'हवे' म्हणणारांची तृप्ति त्या बैठकीत मिळू शकते. आज त्या फारशा बैठकीत गात नाहीत. पण शिष्य परंपरा मात्र अतीव श्रद्धेने जोपासत आहेत. कला देण्याने वाढतात व पुण्याई देऊन जातात. मोगूबाई हें पुण्य जोडीत आहेत. "जें जें आपणासि ठावे। तें इतरासि शिकवावे। शहाणे करून सोडावे। सकलजन" ह्या समर्थवचनाप्रमाणे 'संगीत–शहाणे' करून सोडण्याचे व्रत ही तपस्विनी चालवीत आहे. किशोरी



(पृष्ठ ६१ वर पहा)



## एक उत्तुंग आणि कर्तव्यनिष्ठ व्यक्तित्व

# मेजर चंद्रकांत

कलेला प्रांत, भाषा, जात, धर्मादि मर्यादा नसतात आणि ती जेव्हा मानवी मनातल्या वैश्विकाचा ध्यास घेऊन आविष्कृत होते तेव्हा तर ती नकळतच 'अमोल' बनते, 'व्यापक' बनते. मुंबई मराठी साहित्य संघ नाट्यशाखेच्या वतीने नव्यानेच रंगभूमीवर आलेल्या '**मेजर चंद्रकांत**' ह्या नाटकाचा प्रयोग पाहिल्यानंतर असाच काहीसा विचार मनात येऊन गेला. 'मेजर चंद्रकान्त' हे नाव वाचताक्षणीच ही कथा कुणातरी व्यक्तीचे प्रभावी व नाट्य-पूर्ण चित्रण करण्याच्या हेतूने जन्म पावलेली असली पाहिजे हा विचार मनात चमकून गेला. '**मेजर चंद्रकांत**' हे नाटक मूळ तामीळमध्ये लिहिले गेले. त्याचा गुजराती अनुवाद झाला. त्या नाटकाच्या आधारे 'चित्रपट'ही झाला. आणि आता ते नाटक मराठी पोषाख चढवून साहित्य संघाद्वारे मराठी प्रेक्षकांसमोर आले आहे. हा मराठी वेष मूळच्या तामीळ नाटकाला दिला गेला आहे असं सांगितलं नसतं, तर ते सहज खपून गेलं असतं, इतके हे रूपांतर "बेमालूम" मराठी लेणे ल्याले आहे. आणि त्या मऱ्हाठी वेषांतराबद्दल श्री. वसंत सबनीस यांचे अभिनंदन करायला हवे. ह्या नाटकाची परिभाषा, त्यातल्या व्यथा–वेदना ह्या केवळ 'तामीळ' जीवनापुरत्या रहात नाहीत. त्या मराठी जीवनाशी एकरूप होऊन जातात. (कारण त्या तशा वैश्विकच आहेत) आणि मग ते नाटक रूपांतरित, आधारित असे खऱ्या अर्थाने रहातच नाही. सारे रूपांतर "मऱ्हाठी" जीवनाशीच एकरूप होऊन जाते. परकेपण (वा शिवसेनेच्या भाषेतले उपरेपण) उरतच नाही. हे परकेपण मुळातच जसे त्या विषयात नाही, तसेच ते बाह्य परिवेषातही जाणवत नाही. ह्या विपयापुरते तरी प्रथम सबनीसांचे अभिनंदन करणे आवश्यक ठरते. दुसरे अभिनंदन मुंबई मराठी साहित्यसंघाचे. साहित्यसंघ–नाट्यशाखा हीही एक प्रयोगशील संस्था आहे. (साहित्यसंघ, साहित्यपरिषद अशांसारख्या संस्थांनीच साहित्य व साहित्यांतर्गतच नाट्यविषयक बदलत्या जाणीवांचे व प्रयोगांचे स्वागत करायचे नाही तर कुणी करायचे?) संघाने आजवर अनेक नवनवीन नाटके रंगमंचावर आणली. त्या साऱ्यांनी धंदा केला नाही. आणि 'प्रयोगशील' नाटके तसा 'लौकिक' धंदा करतातच असे नाही. पण ह्या नाटकातून संघाची नवेनवे प्रयोग करून पाहण्याची जिद्द मात्र दिसून आली. वाढलीही. ह्या नाटकातही 'प्रयोग' आहे. बाह्यतः विचार केला तरी सहजगत्या काही गोष्टी नमूद करता येतील. ह्या नाटकाचा लेखक तामीळी आहे. विषय नवा आहे. नाटकात एकही स्त्री पात्र नाही आणि तरीही नाटक रंगतीत कमी पडत नाही. मोजक्या पात्रांच्या मनांचा, त्यांच्या व्यथा–वेदनांचा हा आलेख आहे. तसा रेखीव, सुटसुटीत ! मेजर चंद्रकांत हा काही रंगमंचावरचा पहिला आंधळा नाही ! 'राणीचा बाग' नाटकाची नायिका आंधळी होती. 'राणीचा



बाग'च्या नायिकेला मिळणारी सहानुभूती काही अंशी मेजर चंद्रकांतला मिळते. पण त्याहीपेक्षा अधिक स्नेह, आदर त्याला त्याच्या वागण्या बोलण्यामुळेच मिळतो. ह्या नाटकात खूप गोष्टींचे सूचन आहे. 'रिलीफ' कमी आहे आणि तरीही हा प्रयोग प्रेक्षकांना बांधून ठेऊ शकतो. ह्याही दृष्टीने काहीसे आगळे नाटक साहित्यसंघाने स्वीकारले व जिद्दीने सादर केले म्हणून संघ–नाट्य शाखेचे अभिनंदन. तुझे आहे तुजपाशी हाही एक 'प्रयोग'च होता. त्याने धंदा केला हे संघाचे भाग्य. हे नाटक 'धंद्या'चे गणित 'व्यस्त' राहण्याची शक्यता दिसत असूनही सादर केले म्हणून कौतुक ! !

मेजर चंद्रकात हा भारतीय सेनेचा एक सेवानिवृत्त अधिकारी आहे. दुसऱ्या महायुद्धातल्या ब्रर्मा बॉर्डरवरच्या लढाईत त्याची दृष्टि गेलेली आहे. बाह्यतः दृष्टि गेलेली माणसे अंतर्मुख होतातच असे नाही. पण जिद्दी, मनस्वी माणसांबाबत हे घडते. घडू शकते. मेजर चंद्रकांत हा तसा जिद्दी माणूस आहे. अंधत्वावर मात करण्याची त्याची सतत धडपड आहे. आपलं काही अडत नाही अशा आविर्भावात तो सतत वावरणारा दिसतो. आपल्या संसारावर त्याचे प्रेम आहे. विश्राम व विक्रम ह्या दोन्ही मुलांना तो आईची माया आणि पित्याचे छत्र देतो. आणि त्यांना आईच्या मागे दिलेला हा दिलासा, माया मानून त्यांनीही तीच श्रद्धा, तोच विश्वास, तीच माया आपल्याला द्यावी अशी त्याची साहजिकच अपेक्षा असते. तो आपला नैतिक हक्क आहे असेच तो मानतो. थोरला मुलगा विश्राम त्याच्या जवळच असतो. तो पोलिस इन्स्पेक्टर असतो तर धाकटा विक्रम हा महाविद्यालयात शिकत असतो. ह्या नाटकातली प्रमुख पात्रे ही तीनच. खरं तर ह्या तीन माणसांच्या व्यथा–वेदनांचे हे नाटक. तसे कौटुंबिकच. पण मेजर चंद्रकांताची कसोटी पाहण्यासाठीच जणु दोन पात्रे आली आहेत. ती आहेत समेळ गुरुजी व मोहन ! दोघांचीही कसोटी घेण्याची पद्धत वेगळी. एक जण एकीकडे हसत हसत व हसवीत हसवीत लोचटपणाने त्यांना तसा छळतच राहतो. तर दुसरा त्यांचे जीवनच ढवळून काढतो. त्यांच्या श्रद्धांना, विश्वासाला तो सारखे टोले लगावतो. पण मेजर चंद्रकांत हा एक सामान्य माणूस नाही. तो नुसते बोलत नाही. कृती करून दाखवतो. त्या कृतीतूनच त्याचे व्यक्तित्व उजळून निघते. त्याची कर्तव्यकठोर वृत्ती इतरांपुरती मर्यादित नसते. तर त्या वृत्तीतून तो स्वतःच्या मुलाकडूनच स्वतःला अटक करवून घेतो. त्याचा सारा हिशोब रोखीचा असतो. शिस्तभंग चालत नाही त्याला. कर्तव्यात कसूर झालेली त्याला सहन होत नाही. तो वज्रकठोरही आहे आणि कुसुम-

कोमलही आहे. गडी चुकला म्हणून त्याला चावकाखाली तो फोडू-नही काढतो आणि मग त्याला "फार लागलं का रे ?" म्हणूनही विचारतो. तो स्वत: एका उंच 'स्टेचर' वर सतत उभा आहे. आणि इतरांनी लहानपण सोडून त्या उंचीचा ध्यास घ्यावा असे त्याला वाटत राहते. त्याच्या अंधत्वावर तो मात करण्याची धडपड करत राहतो. त्याला टायपिंग येते व तो त्याचा उपयोग करून आत्मकथा लिहिण्याचा प्रयत्न करीत आहे असे अनेकवार सूचित केले आहे. सैनिकी शिस्त कायम आहे. 'गणिती' हिशोब कायम आहे. त्यात चूक राहू नये यासाठी तो 'दक्ष' आहे. एकदा त्याचे गणित चुकते व तो कोसळतो. त्याचे ते कोसळणे 'सिंबॉलिक' वाटते. त्यानंतर तो पडला आहे. पण त्या पडण्याची किंमत द्यावीच लागते ह्याची त्याला जाण आहे. त्याला तो सामोराही जातो. आपले 'स्टेचर' सोडत नाही. आपल्या मुलानेही ते सोडू नये अशी त्याची भावना आहे. विश्रामच्या प्रगतीच्या मार्गात आपण येऊ नये म्हणून तो त्याला म्हणतो "मी ह्या बंगल्यात एकटा राहीन. पण तू प्रमोशन नाकारू नकोस. पाठवतील तेथे जा." धाकटा मुलगा एस्. सी. सी. त बेस्ट कॅडेट ठरतो याचा त्याला अभिमान वाटतो. त्याच्या चित्रावरून तो प्रेमाने हात फिरवतो. तो घरी आल्यावर त्याला तो पोषाख घालायला सांगतो. गोल्डमेडल त्याला लावायला सांगतो. त्याच्या स्पर्शातून आपल्या स्वप्नाची पूर्ति पाहतो. त्यासाठी पैसा द्यायची त्याची तयारी आहे. मुलगा शंभर रुपये मागतो. तो दोनशे देतो. पण स्वप्न भंगते. सारे मौलिक देऊनही येणारा हा पराभव मेजरला सहन होत नाही. तो कोसळतो. पण पुन्हा सावरतो. आणि जे आले, त्याला धीरोदात्तपणे सामोरा जातो. डोळस माणसांचीही स्वप्ने विरतात. ही तर आंधळ्याची मनस्वितेने पाहिलेली स्वप्ने ! स्वप्ने पाहणे, ती जोपासण्याची जबाबदारी परिश्रमपूर्वक पार पाडणे आणि ती भंग-ल्यावरही माणसातले देवत्व प्रगट करण्याच्या जिद्दीने त्यावर मात करणे हे मानवी मोठेपणाचे लक्षण आहे. मेजॅर चंद्रकांत असा मोठा माणूस आहे. त्याचे स्वप्न भव्य-दिव्य-उदात्त असे आहे. शब्दातूनच ते व्यक्त होणे इथे तरी अपरिहार्य आहे कारण अंधत्वामुळेच त्याला त्या 'वास्तू'च्या मर्यादा पडल्या आहेत. पण ते बोलणे मेजर चंद्रकांत यांच्या व्यक्तिमत्वातले आगळेपण सांगून जाते. शब्द नुसते शब्द रहात नाहीत. समेळ गुरुजी हे एक रिलीफ देणारे पात्र ! ते नुसताच रिलीफ देत नाही तर एक 'टाइप' देऊन जाते. मेजर चंद्रकात त्यांना छत्री देतो. त्यांनी आपल्या मुलीला सून करून घेऊन कायमचे 'छत्र' द्यावे अशी त्यांची भावना असते. त्यांच्या व चंद्रकान्ताच्या सहवासात बऱ्याच पडद्यामागच्या गोष्टी सूचित होतात. "मोहन" च्या निमि-त्ताने मेजरसाहेबांची मानवता, सच्चाई, कणव, इत्यादींचे दर्शन घडते. विशेषत: त्याला खोलीत कोंडल्यानंतर (विश्रामने—नक-ळत) मेजर चंद्रकांतावर तो आरोपामागून आरोप करतो तेव्हा त्या खोलीची किल्ली शोधण्यासाठी मेजर जी धडपड करतात ती मोठी पाहण्यासारखी आहे. माणसाचे मोठेपण सुद्धा नेहमी बारीक सारीक प्रसंगांची कसोटी मागत असते. चंद्रकांतांचीही कसोटी प्रसंगाप्रसंगातून मागितली गेली आहे. हे पहात असताना एक मात्र जाणवत होते की, ह्या कसोट्या अधिक मोठ्या, कठिन व उत्कट होणे आवश्यक होते. मेजर चंद्रकांताचा स्वप्नभंग हा जेवढा मोठा व उत्कट होईल त्या प्रमाणात त्यातले नाटच खुलेल—व्यापक बैठकी-वर जाईल.

ह्या नाटकातले मेजर झाले आहेत दीनानाथ टाकळकर. टाकळ-कर गेली वीस वर्षे रंगभूमीवर आहेत पण ह्या गुणी कलाकाराला म्हणावा तसा वाव मिळाला नाही ह्याची खंत सतत जाणवत होती. नटाला हवे असलेले प्रभावी व प्रसन्न व्यक्तित्व त्यांना लाभले आहे. आणि तरीही हा कलाकार तसा मागेमागेच होता. आचार्य व आता चंद्रकांत ह्या दोन नाटकांनी हा कलाकार आता सुयोग्य प्रकाशात येत आहे हे पाहून बरे वाटते. टाकळकर ह्या भूमिकेत 'फिट्ट' शोभतात. आणि कामही चांगले करतात. युद्धकालीन अनुभवाचे वर्णन करताना, विक्रमचाच खून झाला आहे आणि त्याचा खुनी समोर उभा आहे. त्यालाच आपण एक रात्र आसरा दिला होता ह्याची जाण येऊन होणारी मनाची काहिली त्यांनी समर्थपणे उभी केली. कठोर आणि प्रेमळ, स्वप्नाळू आणि येईल ते स्वीका-रणारा धीरोदात्त, सामान्य आणि तरीही असमान्य होऊ शकणारा चंद्रकांत त्यांनी सहजतेने उभा केला. अभिनंदन ! सतीष दुभाषी (विश्राम) तसा वाव कमीच. पण आहे त्यात चांगले काम केले. दत्ता भट यांचा समेळगुरुजी दीर्घकाळ स्मरणात राहील. त्यांची व्यक्ति-रेखा चांगली झाली आहे. कमलाकर सारंग (मोहन) लक्ष्मीकांत कर्पे (विक्रम) व नाना ओक (महादू) यांची कामे बरी झाली इतकेच ! कमलाकर सारंगांनी अयोग्य वेळी खिडकीत डोकावून प्रयोगाच्या सुविहीततेवर थोडासा आघातच केला. टाकळकरही अडखळले—थोडेसे ! एक गोष्ट खटकली—समेळ गुरूजीसारखा माणूस जर सारखे कपडे बदलू शकत होता तर बाकीच्या पात्रांना पोषाख बदलण्याचे स्वातंत्र्य कां नव्हते ? मेजर साहेबांना तीनही अंक व तेही घरातल्या घरात असताना कायम बूट—पाटलुणीत ठेवण्याची तरी गरज होतीच काय ? कर्पे काही ठिकाणी 'बायकी' हालचाल कां करीत होते ?

नेपथ्य——प्रकाश योजना (प्रकाश मळकर्णेकर) चांगली. ध्वनि संकलन (सुधीर ठाकुर) चागले. आणि दिग्दर्शन नेटके व रेखीव (दामू केंकरे).

साहित्य संघाचे पुनश्च अभिनंदन !

**—चित्रगुप्त**



अनुक्रमणिका








## माओवाद मोकाट सुटला आहे

चीनमध्ये नाही! भारतात. भारतातले त्याचे नाव वेगळे आहे. वाह्य वेप वेगळा आहे कदाचित रंगही वेगळा असेल ( " काला आदमी"चा रंग तो ) वाह्य साधने कदाचित वेगळी असतील. पण ध्येय धोरणावद्दल माओच्या शिष्यवरांच्या मनात कधीच संभ्रम नसतात. संशयाला तिथे थारा नसतो. (कारण संशय सुद्धा घ्यायला डोके 'स्वतःचे' आणि ताळ्यावर असावे लागते. रेजिमेंटेशनमध्ये स्वतःचे डोके असून चालत नाही. समजा असलेच तर त्याने 'सरकारी' इच्छेनुसार चालले पाहिजे ) कितीही वाट पहावी लागली तरी माओवाद व माओवादी आपले (वक) ध्यान सोडीत नाहीत. देश पोखरण्याची रीत एक ! आणि शेतकरी–कामकऱ्यांच्या आड दडून सत्तेचे राजकारण खेळण्याची पद्धतही तीच ! प्रत्यक्षात मात्र ह्यातल्या कितीशा माणसांचा काळचा मातीशी आणि ट्रॅक्टर्सशी संबंध असतो कोण जाणे? 'मातीशी इमान' हा शब्द इथे संभवतच नाही. इथे " माओशी इमान " हा एक धर्म पाळला जाऊ शकतो. माओ व माओवादी आपल्या ( चिनी ) मातीशी इमान राखून आहेत आणि ते इमान ते कधीच कुणाला न विकण्याइतके प्रखर राष्ट्रवादी आहेत हे ह्या गल्लीबोळातल्या माओ-चाओंना कळत नाही असे म्हणवत नाही. मद्याची जशी धुंदी चढते तशी क्रांति-कल्पनेचीही धुंदी चढत असावी. त्या धुंदीत आपला कोण, परका कोण हे कळेनासे होत असावे. रक्ताची धुंदी फक्त चढते. ते रक्त अखेर कोणाचे हे कळेनासे होत असावे. रक्ताची चटकही तशी वाईटच. रक्त हवे म्हटले की मग ते 'झेक' चालते. युगोस्लाव्ही चालते. तिवेटी रक्त तर फारच छान. भारतीय रक्त तर त्याहून गोड आणि त्या रक्ताशी इमान न राखणारांनी जर ते उपलब्ध करून दिले तर विनासायास मिळ-णाऱ्या रक्ताला नकार तरी कसा आणि कां द्यायचा ? अहो, हे तर रक्ताचे नाते. रक्त घेऊनच ते नको कां सिद्ध करायला ? म्हणून माणसे निघाली आहेत, ती माणसे ह्या मातीवर आघात करणाऱ्यांचे हात कलम करण्यासाठी नव्हे, तर आपल्याच बांधवांचे हात कलम करण्यासाठी ! पाक राज्यात जसे काफीर असता कामा नयेत ( म्हणून तर हाकलले गेले. जे गेले नाहीत ते काफीर राहिलेच नाहीत. पाक झाले ) तसे लाल राज्यात प्रतिगामी, बूर्झ्वा लोक असता कामा नयेत. कृपया प्रतिगामी बूर्झ्वा वगैरे शब्दांचे अर्थ विचारून सतावू नये. कालचे क्रांतीचे नेते एकदम बूर्झ्वा कसे झाले ह्याचे उत्तरही मागू नये. पण एकूण प्रतिगामी लोक नकोतच. आणि " चॅरिटी बिगिन्स ॲट होम " ह्या न्यायाने सर्व-प्रथम बंकिम–रवीन्द्र, सुभाषचंद्रादि मंडळींच्या पुण्यपावन स्मृतींनी रंगलेल्या भूमीतच हे 'धर्मकर्म' सुरु करण्यात आले. ह्या माओवादी धर्मकर्माचे आद्यपीठ म्हणजे नक्सलवारी ! आता 'नक्सलवादी' हा परवलीचा शब्द झाला आहे. तो 'देश-भक्त ' आहे असे एकेकाळी आपण साभि-मान म्हणत होतो. आता तो 'नक्सलाइट' आहे असे म्हटले की दहा पिढ्या स्वर्गात गेल्याचा – ( म्हणजे पेकिंगला कारण क्रांतिकारकांचा 'स्वर्ग' तोच ! हवं तर अध्यक्ष लिऊला विचारा ) आनंद होतो. आता हे लोण ठाण्याला पोहचले आहे. केर-ळात त्याने बाजी मारण्याचा प्रयत्न केला. पण गणित चुकले म्हणतात. ते काहीही असो कलकत्त्यापासून केरळपर्यंत आणि बनारसपासून मद्रासपर्यंत आता 'नक्झली' वारे वाहू लागले आहेत. ह्या घटनांकडे 'किरकोळ' कायदा व सुव्यवस्थेच्या मर्या-दित वार्तांकडे पाहतो तसे पाहून चालणार नाही. आज भोवती सीमेवर दोन सतत प्रतिकूल कौल देणारी राष्ट्रे सुसज्ज स्थितीत उभी असताना 'नक्झली' वा अन्य नावे घेऊन जे घरभेद्यांचे राजकारण चालू झाले आहे त्याकडे कुणाही राष्ट्रवादी गटाने 'तटस्था'च्या दृष्टीने पाहून चाल-णार नाही. ह्या देशातली अशांतता ही साठत साठत आलेली आहे. आज आम्ही

गेल्या महिन्यात गाजलेल्या आणखी काही 'कॅरायॅान' स्पर्धा.



पाकिस्तानातील सत्तास्पर्धा जोरात आहे.

अतिशय ' सेन्सिटिव्ह ' झालो आहोत. कुठे काही 'खुट्ट' झाले की, लगेच आम्ही एकदम "युद्धा"चीच भाषा सुरू करतो. मग तो प्रश्न कृषि विद्यापीठाचा असो वा हिंदीचा असो. ह्या अवस्थेचा फायदा घेऊन सर्वत्र बेदिली उत्पन्न करणे व त्या गदारोळात राष्ट्र सापडले की परकी मदतीने इथे 'लाल' सत्ता रोवण्याचा यत्न करणे हा डाव यात आहे. " समाजवादी राष्ट्रे आक्रमण करीत नाहीत " ह्या भाबड्या श्रद्धेची भली मोठी किंमत आम्ही १९६२ साली दिली आहे. ह्या भाबड्या समजुती सोडून देऊन मुक्तिसेनेचे ह्या देशातले हे लाल ' सॅपर्स अ‍ॅण्ड मायनर्स ' आपण जागरूकपणे टिपून काढले पाहिजे. उघड शत्रु परवडला पण हे छुपे रुस्तुम अधिक धोकादायक असतात असाच इतिहासाचा दाखला आहे. केरळाच्या रस्त्यारस्त्यातून हे नक्षलाइट म्हणे शस्त्रास्त्रे, दारुगोळा, बंदुका, हातबॉम्ब घेऊन हिंडत होते. आणि उघडउघड पोलिस चौक्यांवर ह्यांनी हल्ले केले. हे कसे घडू शकले ? हा प्रश्न आता एका प्रांताचा राहिलेला आहे असे मला वाटत नाही. एखादा नारायण वा एखादी अजिता येवढी पराक्रमी असेल तर तिला ' राणीलक्ष्मी ' पयक काढून देऊन काश्मीर वा नेफाच्या सीमेवर पाठवा. पण हे होणे नाही. कारण हे पराक्रम आपल्या देशाच्या स्वातंत्र्याच्याच मुळावर आलेले आहेत. त्यांचा तो 'धर्म' बनला आहे. कम्युनिस्टांच्या प्रभावाखालील विद्यार्थि संघटनाही सध्या कार्यरत झाल्या आहेत. त्यांना तसा आदेश असल्याची वार्ता वृत्तपत्रात प्रसिद्ध झालेली आहे. उत्तर प्रदेशात तसे ' क्रांति ' कार्य सुरूही झालेले दिसते. विद्यापीठे बेमुदत बंद करावी लागणे व विद्यापीठाचे आवारात शस्त्रसज्ज सैनिक ठेवावे लागणे हे त्यातूनच घडते असे मला वाटते. हे जे प्रकार चालू झालेले आहेत त्यांनी साऱ्या राष्ट्रवादी शक्तीनाच जणु आव्हान दिले गेले आहे असे मी मानतो. म्हणूनच ह्या निमित्ताने त्या शक्तींनी एकत्र येण्याची फार मोठी गरज उत्पन्न झाली आहे. मतभेद समजू शकतात. पण राष्ट्रीय अस्मितेला व स्वातंत्र्याला दिले जाणारे आव्हान स्वीकारणे हा त्याहून मोठा 'धर्म' आहे आणि एरव्ही धर्म न मानणारांनीही हा धर्म मानला पाहिजे अशीच जणु काळाची मागणी आहे. चार दोन ' नारायणां' ना बंदिस्त करून हा लढा संपणारा नाही. हा लढा दीर्घकालीन व मूलगामी आहे ह्याची जाण ठेवूनच लढला गेला पाहिजे.

### लष्करशाहीला आव्हान

पाकिस्तानमध्ये गेली दहा वर्षे शासन करीत असलेल्या अयूबशाहीला त्याच देशाच्या एका नेत्याने आव्हान दिले असून एकाकी वाटणाऱ्या त्या आव्हानाला आता सर्वत्र प्रतिष्ठा मिळू लागलेली दिसते आहे. अंतर्गत आव्हान आता उग्र रूप धारण करू लागलेले असून तथाकथित लोकप्रिय अशा अध्यक्षांना सैनिकी पहाऱ्यात भाषणे करावी लागत आहेत. काळ्या निशाणांचे उग्र स्वागत स्वीकारावे लागत आहे. त्याही देशात हे आंदोलन पुन्हा तरुण–विद्यार्थिजनांच्या उद्रेकातून सुरू झाले असून झुल्फिकार अल्ली भूतो, एअर मार्शल ( निवृत्त ) असगरखान, मौलाना भाशाणी, इत्यादि मंडळींनी त्या आंदोलनाला आता 'वजन' प्राप्त करून दिले आहे. पूर्व पाकिस्तानात तर अयूबशाहीविषयी प्रथमपासूनच एक शत्रुत्वाची भावना वसत होती. स्वतंत्र अस्तित्वाचे स्वप्न तिकडे पाहिले जात होते व आहेही ! पण पश्चिम पाकवरची हुकुमशाही पकड आता ढिली झाली असून बडी बडी मंडळी आता दंड थोपटून उभी टाकली आहेत. भारताच्या शत्रुत्वाचे ढोल डिंडिम सतत बडवीत राहून व काश्मिरी सार्वभौमत्वाचे तुणतुणे सतत वाजवीत राहून पायाखालची जळती आग नेहमीच शांत करता येत नाही याचा प्रत्यय अध्यक्ष आयूबना येत असेल. गेल्या दहा वर्षात पाकने भारतावर दोन युद्धे लादली. व पुन्हा युद्धसदृश वातावरण निर्माण करण्याचा प्रयत्न चालू आहेत. पण भारत–पाक सारख्या आर्थिकदृष्ट्या अबल व अविकसित राष्ट्रांना सतत युद्धमान राहून चालण्यासारखे नाही. आणि शत्रुत्वाचे व जिहादचे नारे लावून अन्न, वस्त्र व निवाऱ्यासारख्या माणसाच्या मूलभूत गरजा भागविता येत नाहीत हे जाणण्याइतकी ' जाण ' सत्तेने धुंद होणाऱ्या हुकुमशहांना क्वचितच असते. एक भूतो अटकेत टाकल्याने भविष्य बदलता येत नाही ह्याचा फार प्रभावी प्रत्यय पाक जनतेने अयूबना दिला आहे. आणि विद्यार्थ्यांना त्यांनी ज्या ' टोन 'मध्ये काही आश्वासने दिली आहेत त्या ' टोन ' वरून अयूबना आपल्या पायाखालच्या सरकत्या वाळूची कल्पना आली असेलसे दिसते. अशा परिस्थितीत अंतर्गत अशांतीवरले लक्ष दुसरीकडे केंद्रित करण्यासाठी "गंगेच्या पाण्यावरही पाकचा हक्क आहे" अशासारखे पिल्लू सोडून देऊन आपले काम भागेल अशी त्यांची समजूत असेल तर ती चूक आहे. ह्या बदलत्या परिस्थितीकडे तटस्थतेने पाहण्यापलिकडे खरं तर आपण काही करू शकत नाही. पण तटस्थपणाची प्रतिज्ञा घेतलेल्या दिल्लीकरांना ताष्कंदवीणा हाती घेऊन " सर्व वादंगविषय मिटविण्यासाठी " कायमचे कमिशन नेमण्यासंबंधीची सूचना घाईघाईने केली आहे. ताष्कंदची चाड फक्त आपल्यालाच ! गेल्या दोन अडीच वर्षात पाकने हा करार कसोशीने पाळला ? आजही दररोज प्रतिकूल बातम्याच येतात. अशा परिस्थितीत पाकमध्ये जे काय चालले आहे त्याकडे तटस्थपणे पाहून जे स्थित्यंतर घडेल (घडेलच असेही नाही. कारण ती लष्करी हुकुमशाही आहे. लष्करच फिरले तर मात्र काहीही घडू शकेल ) त्यानुसार पावले टाकणे. ती सावधपणे टाकणे हे अधिक अगत्याचे आहे.

### वर्धा संमेलनाच्या निमित्ताने

कवि– प्राचार्य पु. शि. रेगे यांच्या अध्यक्षतेखाली वर्धा येथे ४, ५, ६ तारखेला ४८ वे मराठी साहित्य संमेलन भरत आहे.

(पृष्ठ ६१ वर पहा)



भारताच्या लोकसंख्येने पन्नास कोटीचा आकडा ओलांडला असून अलिकडच्या गणतीप्रमाणे भारताची सध्याची लोकसंख्या ५२ कोटी ७० लाखांवर गेली आहे. लोकसंख्येत दरवर्षी १ कोटी ३० लाख याप्रमाणे भर पडत असल्याचे आढळून आले आहे.

दुसऱ्या जागतिक युद्धानंतर जगातील–विशेषतः आशिया खंडातील–कित्येक देशांना स्वातंत्र्य मिळाले. या देशांपुढे आपल्या देशातील अज्ञान आणि दारिद्र्य दूर करण्याची समस्या 'आ' वासून उभी आहे. देशाचा मागासलेपणा घालविण्यासाठी नियोजनाची कास धरणे अपरिहार्यच होते; पण नियोजनाचे फायदे जनतेच्या पूर्णपणे पदरात पडूनही जनतेचे दैन्य दूर होत नाही असाच अनुभव आला. याचे महत्त्वाचे कारण म्हणजे बेसुमार वाढत असलेली लोकसंख्या हे आहे. नियोजनाद्वारे होणारी उत्पादनवाढ वाढत्या प्रमाणात निर्माण होत असलेली तोंडे खाऊन फस्त करीत आहेत. म्हणून जनतेचे दुःख




आणि दैन्य दूर करण्यासाठी कुटुंब नियोजनाची नितांत आवश्यकता आहे हे देशातील विचारवंतांच्या ध्यानी आले. घटकांचे नियोजन झाल्याशिवाय देशाचे नियोजन होऊच शकणार नाही.

युद्धोत्तर काळात अन्नसमस्या ही जागतिक समस्या झाली आहे; तथापि पाश्चिमात्य देशांना हा प्रश्न पौर्वात्य देशांइतका भेडसावीत नाही. तरीही त्या देशांतून कुटुंबनियोजनाचे कार्य मोठ्या प्रमाणावर सुरू झाले आहे. कारण सध्याच्या वेगाने लोकसंख्या वाढत राहिली तर त्या देशांपुढेही कठीण परिस्थिती उभी राहील याची त्यांना जाणीव झाली आहे. भारतासारख्या मागासलेल्या देशातील आम जनतेमध्ये अशी जाणीव उत्पन्न होणे शक्यच नसते. शिक्षणाच्या अभावामुळे आपणास जाचणारे प्रश्न कोणते हेच जनतेला समजत नाही, मग त्यावर उपाययोजना करण्याची गोष्टच नको! त्यामुळे परिणाम असा झाला आहे की पुढारलेल्या देशातील लोकसंख्या ठराविक प्रमाणात कमी होत आहे, पण आपल्याकडे मात्र कुटुंब नियोजनाचे खास प्रयत्न करावे लागत आहेत.

### उत्पादनवाढ फोल ठरविली

भारताला स्वातंत्र्य प्राप्त झाल्यावरोबर आर्थिक नियोजनाला प्रारंभ झाला. निरनिराळ्या क्षेत्रात उत्पादनवाढीवर भर देण्यात आला आणि त्यासाठी जोरदार प्रयत्न सुरू झाले. त्यांचा योग्य तो परिणामही दिसून आला. गेल्या वीस वर्षात औद्योगिक क्षेत्रात आणि शेती क्षेत्रातही विकासाचे अनेकविध प्रयत्न सतत करण्यात आले आणि त्या दोन्ही क्षेत्रात चांगले यशही मिळाले. औद्योगिक उत्पादनात दीडशे टक्क्यांनी वाढ झाली तर धान्योत्पादन बासष्ट टक्क्यांनी वाढले. शैक्षणिक क्षेत्रातील सोयींमध्ये पूर्वीच्या तिप्पटीने वाढ झाली असून आता ऐंशी टक्के विद्यार्थ्यांना प्राथमिक शिक्षण मिळत आहे. साथीच्या काही प्रमुख रोगांचे देशातून कायमचे उच्चाटन करण्यात यश लाभले आहे तर इतर काही रोगांवर नियंत्रण घालण्याचे प्रयत्नही बहुतांशी सफल होत आहे. मलेरिया, देवी, कॉलरा, प्लेग हे रोग आता आटोक्यात आले आहेत. इस्पितळे आणि दवाखाने यांच्या संख्येत वाढ, सध्याच्या इस्पितळातील खाटांमध्ये वाढ करण्यात येत आहे. १९४७ च्या मानाने डॉक्टरांची

**कृ. वि. पेठे**

संख्या दुपटीने वाढली आहे. तर परिचारिकांच्या संख्येत सहापटीने वाढ झाली आहे. या सर्वांचा परिणाम म्हणून आपल्याकडील आयुर्मर्यादेची सरासरी २८ वर्षांवरून ५० वर्षांवर पोहोचली आहे. महत्त्वाच्या क्षेत्रांमध्ये झालेली ही वाढ समाधानकारक नाही असे कोणीतरी म्हणू

शकेल काय ? पण या वीस वर्षात लोकसंख्येतही बेसुमार वाढ झाल्यामुळे सुखसोयींमध्ये झालेली वाढ जाणवत नाही, हेच आपले दुर्दैव आहे. विकासाचे प्रयत्न निष्फळ करून टाकणाऱ्या लोकसंख्या वाढीमुळे दरमाणशी उपलब्ध असलेल्या अन्नधान्य प्रमाणात घट झाली. शालेय शिक्षणाची आवश्यकता असलेली सहा कोटींपेक्षा अधिक मुले आज शाळेबाहेर आहेत. औद्योगिक कारखाने वाढत्या प्रमाणावर अस्तित्वात येऊनही बेकारांची संख्या कमी न होता वाढतच आहे. शहरातून आणि ग्रामीण भागातूनही अद्यापि सुमारे दहा कोटी घरांचा तुटवडा आहे.

सुदैवाची गोष्ट अशी की जननसंख्येच्या प्रमाणात त्या मानाने फारशी वाढ झालेली नाही असे त्यावावतीतल्या उपलब्ध आकड्यांवरून दिसते; पण आरोग्यविषयक सोयींमध्ये परिणामकारक वाढ झाल्यामुळे मानवाची मृत्युसंख्या घटली आहे. त्यामुळे लोकसंख्येत वाढ होत आहे. माणसे आपोआप मरत नाहीत म्हणून त्यांना मारून टाकण्याचा आणि अशा रीतीने लोकसंख्या कमी करण्याचा उपाय कोणी सुचविणार नाही. तेव्हा लोकसंख्या कमी करण्यासाठी संतती-प्रतिबंध करणे हा एकमेव मार्गच काय तो शिल्लक राहातो.

## नियोजन म्हणजे देशाचा संकल्प

कुटुंबांमधून आणि व्यक्तीतही नियोजनाची प्रखर जाणीव निर्माण झाली पाहिजे आणि ती कायम टिकली पाहिजे. नियोजन म्हणजे परमेश्वराने अगर कोणातरी अवतारी पुरुषाने दिलेले वरदान नव्हे. आर्थिक नियोजनाच्या मागे देशाची संकल्पशक्ती उभी असली पाहिजे. तशी ती नसेल तर नियोजनाचा डोलारा कोसळल्याशिवाय राहणार नाही. नियोजन म्हणजेच देशाचा संकल्प. देश हा अमूर्त असतो, पण त्यातल्या व्यक्ती मूर्त स्वरूपात वावरत असतात आणि व्यक्तींचाच देश बनतो. म्हणून देशाचे आर्थिक नियोजन साधण्यासाठी व्यक्तींच्या प्रयत्नांची आवश्यकता असते. त्यासाठी कुटुंब नियोजनाचा प्रचार करणे हा आजचा महान धर्म आहे.

समाजाच्या आणि पर्यायाने देशाच्या कल्याणासाठी मनुष्य स्वतः होऊन काही प्रयत्न करणार नसेल, स्वतःवर विवेकाचे बंधन घालणार नसेल तर त्यावर कायद्याचे बंधन आणणेही देशाच्या अंतिम हिताच्या दृष्टीने योग्य ठरेल. तथापि तसा प्रसंग निदान आज तरी ओढवलेला नाही. समाजाला कुटुंब नियोजनाच्या उपायांची आवश्यकता अजूनही तीव्रतेने भासत नाही याचे कारण अज्ञान आणि उदासीन वृत्ती. कुटुंब नियोजनाचा प्रचार करणे याचाच अर्थ या दोन विघातक समाजप्रवृत्तींशी झगडा करणे होय !

कुटुंबात जन्मणारी अपत्ये ही ईश्वरी देणगी आहे असे मानण्याची आपल्याकडे प्रवृत्ती आहे. जो चोच देतो तो दाण्याचीही सोय करतो, जो जन्माला घालतो तो अन्नोदकाचीही आधीच सोय करून ठेवतो असल्या वाष्कळ वचनांवर विश्वास ठेवणाऱ्या अंधश्रद्ध लोकांचीही फार मोठी संख्या आपल्या देशात आहे; पण एखाद्या कुटुंबात भाराभर मुले असली आणि ती उपाशीतापाशी, उघडीनागडी हिंडू लागली तरी त्या कुटुंबाच्या मदतीला कोणीही धावून जात नाही याचीही उदाहरणे लोकांसमोर आहेतच. ही उदाहरणे लोकांना दाखवून देण्याचे काम प्रचारकांनी केले तर लोकांमध्ये आवश्यक ती जागृती निर्माण होईल. चीनने भारतावर आक्रमण केले होते आणि नंतर पाकिस्ताननेही भारतावर स्वारी केली होती त्यावेळी परकीय संकटाच्या प्रखर जाणिवेने सारा देश खडबडून उठला आणि प्रतिकाराला सिद्ध झाला तसा प्रकार स्फोटक लोकसंख्या वाढीच्या बाबतीतही झाला पाहिजे. तसे झाले नाही आणि लोकसंख्या वाढीला वेळीच आळा बसला नाही तर. . . तर देशापुढे अत्यंत विकट परिस्थिती निर्माण झाल्याशिवाय राहणार नाही. तशा परिस्थितीत जगातील कोणताही देश आपल्या मदतीला येऊ शकणार नाही. सध्याचे जननप्रमाण दर हजारी ४१ आहे. ते प्रमाण येत्या दहा वर्षांच्या काळात २५ पर्यंत खाली आणले तरच आपला तरणोपाय आहे.

देशातील नेत्यांनी ही परिस्थिती ओळखलेली आहे. म्हणूनच चौथ्या पंचवार्षिक योजनेच्या काळात कुटुंब नियोजनाच्या कार्यक्रमाला प्राधान्य देण्यात आले आहे. या कालावधीत प्रजोत्पादनक्षमता असलेल्या वयोगटातील साडेदहा कोटी जोडप्यांना कुटुंबनियोजनासाठी प्रवृत्त करण्यात यावे असे लक्ष्य ठरविण्यात आले आहे. ते लक्ष्य गाठण्याचा प्रयत्न करणे हे अत्यंत अवाढव्य स्वरूपाचे काम आहे. विशेषतः आपल्या देशाचा प्रचण्ड विस्तार, शैक्षणिक मागासलेपण, विविध भाषा आणि विविध प्रकारच्या चालीरीती तसेच कोणत्याही प्रकारच्या नव्या बदलास पारंपरिक विरोध इत्यादींमुळे कुटुंब नियोजनाचे लक्ष्य गाठणे हे अत्यंत विकट काम आहे याबद्दल दुमत होणार नाही. तसेच या सर्व अडचणींमुळेच या कामी खर्चही फार मोठ्या प्रमाणावर करावा लागतो हेही उघड आहे. चौथ्या योजनेत या कामासाठी २२९ कोटींच्या रकमेची तरतूद केलेली आहे ह्याचे हेच कारण होय.

## प्रशिक्षणाची व्यवस्था

कुटुंब नियोजनाचा प्रचार करण्याचे काही विशिष्ट तंत्र आहे. त्याचे प्रचारकांना शिक्षण दिले पाहिजे. डॉक्टर्स आणि वैद्यकीय शाखेतील विद्यार्थी यांची या कामासाठी फारच गरज असते. त्यांनी या कामाकडे लक्ष द्यावे म्हणून त्यांना विविध प्रकारे उत्तेजन देण्याची सोय सरकारने केली आहे. प्रचार आणि प्रसार यांसाठी सर्व उपलब्ध साधनांचा म्हणजे नभोवाणी, दूरचित्रवाणी, चित्रपट, वृत्तपत्रे, व्याख्याने यांचा उपयोग तर करावयाचा आहेच, पण तेवढ्यानेही भागणार नाही म्हणून घरोघर जाऊन व्यक्तीसंपर्क साधण्याचाही

प्रयत्न झाला पाहिजे. हे सर्व प्रयत्न सरकारी पातळीवरून होत राहतीलच; पण सर्व सुबुद्ध व्यक्तींनीही या प्रयत्नांना हातभार लावला तर हे कार्य अधिक सुकर होईल, अधिक प्रभावी होईल.

हे कार्य निकडीचे आणि आव्हान देणारेही आहे. त्यात काम करणाऱ्या सुमारे सव्वा लाख कर्मचाऱ्यांची कसोटीच लागणार आहे यात शंका नाही. या कार्यक्रमासाठी काही गोष्टी गृहीत धरण्यात आल्या आहेत त्यात खालील गोष्टींचा समावेश आहे :—

(१) कुटुंब नियोजनाचा कार्यक्रम लोकांनी स्वीकारावा यासाठी त्याची त्यांना निकड पटवून दिली पाहिजे.

(२) आपली मुलेबाळे, आपला समाज यांच्याविषयींची आपली जबाबदारी लक्षात घेऊन आपल्याला किती मुले असावीत याचा पालकांनीच निर्णय घेतला पाहिजे.

(३) लोकांना त्यांच्या घरानजिकच ही सेवा उपलब्ध करून दिली पाहिजे.

(४) लोकांच्या धार्मिक भावना, नीतीकल्पना, कौटुंबिक जबाबदाऱ्यांची त्यांच्यात असलेली जाणीव यांना कोठेही न दुखविता योग्य माध्यमाद्वारे अगर त्यांची श्रद्धा असलेल्या नेत्यांद्वारे त्यांच्यापर्यंत पोहोचण्याचे प्रयत्न झाले पाहिजेत. कोणीही काहीही दावा सांगितला तरी आशियाचे राष्ट्रांचे पुढारीपण भारताकडेच आहे यात संशय नाही. म्हणून भारतात यशस्वी होणारे कार्यक्रमच इतर देश ... प्रकार अंगिकारतील या दृष्टीने कुटुंब नियोजनाच्या भारतातील कार्याकडे साऱ्या जगाचे लक्ष वेधलेले आहे. त्यामुळे अर्थातच आपल्यावरील जबाबदारी वाढलेली आहे. म्हणून हे कार्य आपण अधिक कसोशीने पार पाडले पाहिजे. कुटुंब नियोजनाचा कार्यक्रम यशस्वी करण्यातच आपले सुख, समृद्धी आणि प्रगती सामावलेली आहे.

• • •

---

(पान ५८ वरून—**दीपमाला**)

साहित्य संमेलने तशी दर वर्षी कुठे ना कुठे तरी भरतातच. तेव्हा त्यात तसे नवीन काय? पण तरीही संमेलने होतात. आणि व्हावीत. त्यात अध्यक्षीय भाषण महत्वाचे असले तरी मुख्यतः तेथे होणारे "संमेलन" महत्वाचे असते. आणि तसे 'संमेलन' होतेच असे नाही अशी अनेकांची व माझीही अनुभवसिद्ध तक्रार आहे. द्रव्य खर्च करून माणसे वर्धा, औरंगाबाद, दिल्ली, भोपाळसारख्या ठिकाणी जातात तेव्हा ती केवळ 'स्थळे' पाहण्यासाठीच जातात असे नाही. परिचय कक्षा वाढाव्यात, नवे विचार कानी यावेत, चर्चा संवाद व्हावेत, प्रादेशिक (साहित्य विषयक) समस्यांची कल्पना यावी, काही स्नेह जुळावेत, 'पेन फरेंडशिप्स' निर्माण व्हाव्यात अशा अनेक अपेक्षा माणसांच्या असतात. व्यासपीठावर बसणारे—बोलणारे साहित्यिक नावनिशीवार कळतात. पण परिचय होत नाही. जे व्यासपीठावर येत नाहीत, त्यांचे परिचयही होत नाहीत. अनौपचारिक संमेलने होत नाहीत. परिसंवाद होतात तेही बरेचसे जुजबी. काही मौलिक देऊन न जाणारे. हा वार्षिक फड त्यामुळेच चाकोरीत फिरतो आहे. अध्यक्ष बदलतात. जागा बदलते. वर्ष बदलते. काही 'कॉंक्रीट' घडत नाही. साहित्य संमेलनाच्या निमित्ताने काही वार्षिक स्पर्धा आयोजित करायला काय हरकत आहे? यशस्वी स्पर्धकांना संमेलनाने पुरस्कार—पारितोषिक द्यायला काय हरकत आहे? संमेलनाच्या निमित्ताने वर्षातले "द बेस्ट" संपादित करून संमेलनाचे प्रातिनिधिक प्रकाशन म्हणून संमेलनात प्रकाशित कां करू नये? महाराष्ट्र मोठा झाला आहे, त्या दृष्टीने विदर्भ, मराठवाडा, दक्षिण महाराष्ट्र, बडोदा, इंदोर, ग्वाल्हेर भोपाळसारख्या वा दिल्लीसारख्या मराठीच्या संस्कृतिक क्षेत्रातून त्या त्या भागाचे प्रातिनिधिक साहित्य संमेलनाच्या निमित्ताने कां सादर करण्यात येऊ नये? लेखिकांचा मेळावा घेण्यात येणार आहे असे समजते. कल्पना चांगली आहे. पण एकूण सर्वच लहान मोठ्या लेखकांचा अनौपचारिक मेळावा व्हावा. सहलीही होणार आहेत. संमेलनाध्यक्षांचे भाषण हे चाकोरीबाहेर जाताना दिसत नाही. वार्षिक आढावा त्यांनी धावत्या पद्धतीने घेतलाच पाहिजे काय? त्या ऐवजी त्यांनी एखादा 'थेसिस' कां मांडू नये? उदा. कविवर्य पु. शि. रेगे हे एक 'स्वतंत्र प्रज्ञेचे व 'स्वतंत्र' प्रतिभेचे कवि आहेत. त्यांनी स्वतः नवकवितेला काही मौलिक व आगळेही दिले आहे. आज गेली २०।२५ वर्षे ते सतत काव्यलेखन व काव्यसमीक्षाही करीत आहेत. ह्या वाटचालीतले विविध अनुभव, बदललेल्या जाणीवा, बदललेला फॉर्म व बदलते साहित्य विषयक विचार (बदलते असल्यास) ह्या संबंधीचे मनमोकळे आत्मप्रगटीकरण कां करू नये रेगे काय करणार आहेत ते ठाऊक नाही. पण वाङमयाचा एक चाहता व अभ्यासक ह्या दृष्टीने त्यांनी हे अध्यक्षीय भाषणात न केले तरी अध्यक्षीय वर्षात करावे असे मला तरी निदान वाटते. संमेलन यशस्वी होवो. काही नवे घडो ही सदिच्छा व्यक्त करतो.

—**सारस्वत**

---

(पृष्ठ ५४ वरून—**सन्मानपुष्पे**)

आमोणकर (कन्या), कमल तांबे ह्या त्यांच्या नामवंत शिष्या आहेत. व्यथा पचवून, त्याना मधुर सुरात बुडवून मधुरतर करून रसिक जनांच्या समोर 'चीज' म्हणून पेश करणाऱ्या मोगूबाई अनेक अर्थांनी तपस्विनी ठरतात. सुर जेव्हा दर्द पिऊन येतात तेव्हा एक सुरब्रम्ह निर्माण होते. दर्द उरतच नाही. अवघी सृष्टि आनंदमय होते. ती सृष्टी आनंदमय व्हावी म्हणून जी दर्द सुरमय होते तिला अभिवादन! मोगूबाईंनी नेमके हे केले आहे. म्हणून त्यांच्या आनंदरूप सुरांना अभिवादन. त्यांच्या सुरसाधनेला अभिवादन. आणि त्यांचा सुजाणपणे गौरव करणाऱ्या अकादमीलाही अभिवादन !! —**आदित्य**






मध्य प्रदेशातील सटणा जिल्ह्यातील झिण्णा गावच्या परमेश्वर दिन याने 'निर्बिजिकरण' (vasectomy) करून घेतल्याने तो आता सुखी झाला आहे.

सध्यांचे युग हे अंतरिक्ष संशोधनाचे युग आहे. चंद्रावर आपण केव्हा तरी पोहोचू असे मानवाला वाटत आहे. पृथ्वीवर झालेल्या गर्दीमुळे दुसऱ्या ग्रहावर जावे असे आज तरी मानवाला वाटत नाही. तथापि, आजच्या वेगाने लोकसंख्या वाढत राहिली तर मात्र कदाचित त्याच्यावर अशीही पाळी येऊ शकेल.

लोकसंख्यावाढ हा एक जागतिक स्वरूपाचाच प्रश्न आहे. परंतु विकसनशील देशात या समस्येचे स्वरूप अधिक उग्र आहे. भारताचेच उदाहरण घ्या ना! १९५१ मध्ये ३६ कोटी असलेली लोकसंख्या १९६६ मध्ये ५० कोटींवर आणि आज ५३ कोटींवर गेली आहे. चालू शतकाच्या अखेरीस ती १०० कोटींवर जाईल असा अंदाज आहे. याचाच अर्थ, सुमारे ५० वर्षात लोकसंख्येत जवळजवळ तिपटीने वाढ झालेली असेल.

## दर हजारी ४१ वरून २५ वर

विकासाची फळे लोकांच्या पुरेपूर पदरात पडावीत म्हणून लोकसंख्येत प्रचंड वेगाने होणारी ही वाढ रोखण्यासाठी आणि जननाचा वेग कमी करण्यासाठी कुटुंब नियोजनाच्या शास्त्रशुद्ध पद्धतींचा प्रसार करण्याचे कार्य नेटाने चालविण्याचे सरकारने ठरविले आहे.

तीनपेक्षा अधिक मुले आपणाला होऊ नयेत असे देशातील सर्व जोडप्यानी ठरविले तर सध्याचे दर हजारी असलेले ४१ हे जनन-प्रमाण २५ वर येईल असा अंदाज आहे.

जननाचे प्रमाण १९७५-७६ पर्यंत २५ वर व १९७८ पर्यंत २३ वर आणण्याचे संकल्पित उद्दिष्ट लोकानी कुटुंब नियोजनाचा अवलंब केला तरच गाठता येईल.

## आटोपशीर कुटुंब म्हणजे वरदान

मुलींची लग्ने २० व्या वर्षानंतर व मुलांची २५ नंतर झाली तर पुढील १० वर्षात जननाचे प्रमाण १५ टक्क्यानी घटेल असा अंदाज आहे. यामध्ये दुसराही एक फायदा आहे नि तो म्हणजे मुलामुलीना आपले शिक्षण पूर्ण करता येईल आणि आईवडिलांची जबाबदारी ती अधिक चांगल्या प्रकारे पार पाडू शकतील. मानसिक आणि शारीरिक पूर्णतेला शिक्षणाची जोड मिळाली की कुटुंब आटोपशीर ठेवण्याकडे कल असतो असे या बाबत केलेल्या पाहणीत दिसून आले आहे.

मुलांची संख्या तीनवर मर्यादित केली म्हणजे लोकसंख्याविषयक सर्वच प्रश्न सुटले असे नव्हे. आईची तसेच मुलाची तब्येत व आरोग्य सुदृढ राहण्याकरिता पाळण्यात काही ठराविक अंतर असणे आवश्यक आहे.

आपणाला तीनच मुले असावीत असेच लोकाना सर्वसाधारणपणे वाटत असते असे या बाबत केलेल्या पाहणीत दिसून आले आहे. तीनहून अधिक मुले असू नयेत असे वाटत असले तरी पाहिजे तेवढीच मुले होऊ शकतात नि त्यासाठी सोयी उपलब्ध आहेत याची कल्पना नसल्याने त्याना अधिक मुले होतात.

## देशाच्या आर्थिक विकासासाठी

पाहिजे तेवढीच मुले व्हावीत म्हणून आज कित्येक सोयी उपलब्ध आहेत. उदा. नवविवाहित दंपतीला पहिले मूल लवकर होऊ नये असे वाटत असेल तर नवऱ्याने कण्डोम्स किंवा निरोध वापरल्यास त्याना ही गोष्ट साध्य करता येईल. मूल झाल्यानंतर पत्नीने लूप वापरल्यास पाळणा पाहिजे तेवढा लांबविता येईल. दोन किंवा तीन मुलानंतर पतीला किंवा पत्नीला संततिप्रतिबंधक शस्त्रक्रिया करून घेता येईल. ही शस्त्रक्रिया विनामूल्य केली जाते. कुटुंब नियोजनाच्या विविध सोयी देशात अनेक ठिकाणी उपलब्ध करून देण्यात आल्या आहेत. उलटा लाल त्रिकोण ही कुटुंब कल्याण केंद्राची खूण आहे. ही खूण पाहून केंद्र सहज ओळखता येईल. या केंद्राचा अधिकाधिक प्रमाणात लाभ घेऊन व मुलांची संख्या तीनपर्यंत मर्यादित करून आणि प्रत्येक मुलात किमान तीन वर्षांचे अंतर राखून लोकानी सहकार्य दिले तर जननाचे प्रमाण घटेल नि राष्ट्राचा आर्थिक विकास अधिक वेगाने होईल.

• • •





अनुक्रमणिका

# कुटुंब कल्याण



भारतातील कुटुंब नियोजन कार्यक्रम म्हणजे मानवी इतिहासात आरोग्य आणि समाज कल्याण यासाठी हाती घेण्यात आलेला सर्वात मोठा कार्यक्रम आहे. मुले होऊ शकतील अशा भारतातील १० कोटी जोडप्यांच्या दृष्टिकोनात वदल घडवून आणून त्यांनी या ना त्या कुटुंब नियोजन साधनाचा वापर करावा म्हणून त्यांचे मन वळविणे हा याचा उद्देश आहे. जगातील कोणत्याही देशात इतक्या व्यापक प्रमाणात हा कार्यक्रम हाती घेण्यात आलेला नाही. या कार्यक्रमाच्या व्याप्तीचा आणि त्याच्याशी निगडित असलेल्या अनेक बाबींचा विचार करता, त्यासाठी अत्यंत कार्यक्षमता असण्याची व नेटाने सूत्रबद्ध प्रयत्न करण्याची गरज आहे.

कुटुंब नियोजनाचा कार्यक्रम भारताने अलीकडेच हाती घेतला असला तरी भारतीय स्त्री–पुरुषांनी या कार्यक्रमाला योग्य तो प्रतिसाद देऊन तो यशस्वी केला आहे. जून १९६८ पर्यंत ४३ लक्ष संतति प्रतिबंधक शस्त्रक्रिया करण्यात आल्या. अशा जागतिक शस्त्रक्रियेच्या ५० टक्के इतके हे प्रमाण पडते. लूप बसविण्याच्या कार्यातही भारतात अशीच प्रगती झाली असून २४ लक्षांहून अधिक लूप बसविण्यात आले. जगातील इतर देशांत झालेल्या एकूण कार्याइतके भारतात हे कार्य झालं आहे.

## काही बोलके आकडे

कुटुंब नियोजनाचे कार्य पद्धतशीरपणे व योग्यप्रकारे चालले आहे किंवा नाही, केवळ शहरातच नव्हे तर अगदी आडवळणी असलेल्या ग्रामीण विभागातही या कार्यक्रमाचे लोण पोहोचले आहे वा नाही याबाबतची पाहणी करण्यात आली. गांधीग्राम येथील ग्रामीण आरोग्य आणि कुटुंब नियोजन संस्थेने केलेल्या पाहणीत उत्तेजक निष्कर्ष मिळाले आहेत. जननाचे प्रमाण दरहजारी ४४ वरून ३६ वर आल्याचे या पाहणीत दिसून आले. मुंबई येथील डेमोग्रॅफिक ट्रेनिंग अॅण्ड रिसर्च सेंटरने केलेल्या पाहणीत मुंबई शहराच्या परिसरात जननक्षमतेत १२ टक्क्यांनी घट झाल्याचे दिसून आले. सिंगुर येथे केलेल्या पाहणीत जननक्षमतेचे प्रमाण दरहजारी ४२ वरून ३४ वर व कलकत्त्याच्या चेतला जिल्ह्यात २९ वरून २४ वर आल्याचे दिसले. आसाममधील चहा मळचात हाती घेण्यात आलेल्या लूप कार्यक्रमामुळे जननाचे प्रमाण ५३ वरून ३७ वर व प. बंगालमधील चहा मळचात ३५ वरून २८ वर आले. चंदीगड येथे हाती घेण्यात आलेल्या कुटुंब नियोजन मोहिमेमुळे जननाचे प्रमाण ३४ वरून २८ वर आले.

कुटुंब नियोजन कार्यक्रमामुळे आतापर्यंत १.२ कोटी नव्या जन्माना आळा वसला असावा असा अंदाज आहे. १९६७-६८–मध्येच केवळ ११,६३,६५९ नव्या जन्मांना प्रतिबंध करण्यात आला आणि त्यामुळे राष्ट्राला ३८० कोटी रुपयांचा आर्थिक लाभ झाला. कुटुंब नियोजन कार्यक्रमाच्या प्रगतीची पाहणी देशाच्या सर्व भागात करण्यात येत असून जनतेच्या मनात व दृष्टिकोनात वदल झाल्याचे दिसून येत आहे. आटोपशीर किंवा छोटे कुटुंब म्हणजे सुखी कुटुंब हे लोकांनी ओळखले असल्याचे दिसून येते.

## संतती प्रतिबंधक शस्त्रक्रिया

सन १९६७-६८ मध्ये संतति-प्रतिबंधक कार्यक्रमाने विशेष लोकप्रियता संपादन केली. त्यामागील वर्षी केवळ ८ लक्ष तर यावर्षी १८ लक्ष संतती प्रतिबंधक शस्त्रक्रिया करण्यात आल्या. शस्त्रक्रिया करून घेण्यासाठी देशाच्या सर्व विभागात ३११० कायम स्वरूपाची व ३२६ फिरती केंद्रे सुरू करण्यात आली आहेत. संतति प्रतिबंधक शस्त्रक्रिया करून घेतल्यानंतर दुर्दैवाने मुले मरण पावली तर मुले होण्यासाठी परत शस्त्रक्रिया करून घेण्याची सोय ५४ केंद्रांत करण्यात आली आहे.

## लूप : प्रभावी साधन

पाळण्यामध्ये ठराविक अंतर राहण्यासाठी किंवा ठेवण्याकरता आतापर्यंत तरी लूप हे सर्वात उपलब्ध असलेल्या साधनात उत्कृष्ट साधन म्हणून प्रसिद्ध आहे. १९६७-६८ मध्ये ६ लक्ष ६२ हजार १७८ लूप बसविण्यात आले.१९६८-६९ च्या पहिल्या तिमाहीत १८ हजार ६०७ लूप बसविण्यात आले. यामुळे आता हा आकडा २४ लक्ष १० हजार ४१३ वर गेला. लूप बसविण्यापूर्वी तसेच बसविल्यानंतर आरोग्यविषयक चाचणी करण्यात येते. त्याचप्रमाणे लूप बसविल्यानंतर काही त्रास होत असेल तर उपचार करण्याची सोयही उपलब्ध करून देण्यात आली आहे. लूप बसविण्यासाठी ३६३ फिरती आणि ३६९५ कायम स्वरूपाची केंद्रे सुरू करण्यात आली आहेत.

पोटात घ्यावयाची संतती प्रतिबंधक औषधे किंवा गोळ्या पुरविण्याकरिता प्रयोगादाखल २०० केंद्रे सुरू करण्यात आली आहेत.

## कण्डोम्स

कण्डोम किंवा 'निरोध' हे संतती नियमनाचे एक प्रभावी साधन म्हणून अजूनही लोकप्रिय आहे. या साधनाचा वापर करणाऱ्या.






अनुक्रमणिका

लोकांचे प्रमाण दरहजारी ६ होते ते आता १८ वर गेले आहे. जपान व कोरियामधून कंडोम्सची आयात करण्यात येते. अमेरिका आणि स्वीडन देणगीदाखल कण्डोम्सचा पुरवठा करतात. खाजगी क्षेत्रातील एका फर्मने कण्डोम्सच्या वार्षिक उत्पादनात वाढ करून ते ३.७४ वरून ७.५ कोटी कण्डोम्सवर नेण्याचे ठरविले आहे. लघु उद्योग क्षेत्रातील कारखाने व त्रिवेंद्रम येथील सरकारी कारखाना यांच्या एकूण उत्पादनशक्तीचा विचार करता, देशातील कण्डोम्सचे उत्पादन २.८८ कोटीवर जाईल. कण्डोम्सच्या वांटपासाठी खास व्यवस्था करण्यात आली आहे.

### आंतरराष्ट्रीय साहाय्य

यूएसएड १९६८ मध्ये १.७ कोटी आणि १९६९ मध्ये १.५ कोटी कण्डोम्सचा पुरवठा करणार आहे. तसेच, कुटुंब नियोजन कार्याच्या साहित्यासाठी २० लक्ष डॉलर कर्ज देण्याबाबत एक करारही या संघटनेने केला आहे. त्याचप्रमाणे संशोधन, प्रशिक्षण व प्रसार याकरता या संघटनेने ८.५ कोटी रुपये दिले आहेत.

कण्डोम्स, छपाई संच, ऑफसेट पेपर, ग्लेज्ड न्यूजप्रिंट आणि दृक्-श्राव्य साधनांनी सज्ज असलेली वाहने पुरविण्याचे स्वीडनच्या आंतरराष्ट्रीय विकास यंत्रणेने मान्य केले आहे. फोर्ड फाउण्डेशननेही २२.८ लक्ष डॉलर्सचे साहाय्य दिले आहे.

आंतरराष्ट्रीय साहाय्य व तांत्रिक सल्ला यांचे स्वागत कितीही उचित असले तरी स्वावलंबनाला अत्यंत महत्त्व आहे. भारताने हे ओळखले आहे आणि लोकसंख्या वाढीला आळा घालण्याच्या कार्यक्रमासाठी भारत स्वतःच्या साधनसामुग्रीवरच अवलंबून आहे ही एक आनंदाची गोष्ट आहे.

• • • • •

# भारतातील लोकसंख्या नियंत्रण

• • • • •

भारतात आखण्यात आलेल्या कुटुंब-नियोजन मोहिमेएवढी व्यापक व मोठी मोहीम जगाच्या इतिहासात आतापर्यंत झाली नसेल. वैद्यकीय, आरोग्य व समाज कल्याण क्षेत्रातील ही एक अद्वितीय मोहीम आहे. ज्या एका परंपराबद्ध समाजात खाजगी चर्चेतही वैवाहिक संबंधांचा उल्लेख वर्ज्य समजला जाई त्याच समाजात कुटुंब नियोजनाची साधकबाधक चर्चा नि स्वीकार होऊ लागला आहे ही एक क्रांती आहे. वृत्तपत्रे, सभा, परिसंवाद इत्यादि माध्यमातून या कार्यक्रमाची जी चर्चा चालते त्यावरून हा विषय समाजाच्या जिव्हाळ्याचा बनला आहे हे स्पष्ट होईल. समाजातील परिवर्तनाचे हे चिन्ह आहे. छोटे कुटुंब हे आर्थिक दृष्ट्या हितावह असते तसेच कुटुंबाच्या सुखासमाधानाची नि कल्याणाची किल्ली म्हणजे छोटे कुटुंब होय याची जाणीव जनतेत वाढत्या प्रमाणावर होत आहे.

दहा कोटी दांपत्यांजवळ या व्यक्तिगत बाबतीत बोलायचे म्हणजे जुने मार्ग फारसे उपयोगी पडत नाहीत. कुटुंब नियोजन कार्यकर्त्यांनाच लोकांकडे जावे लागेल.

### समस्येची तीव्रता

लोकसंख्यावाढीची समस्या किती तीव्र आहे हे आपल्या विकासाच्या प्रयत्नांकडे पाहिले की लक्षात येईल. नियोजनानंतर भारताचे राष्ट्रीय उत्पन्न ६४ टक्क्यांनी वाढले. परंतु दरडोई उत्पन्न मात्र २१ टक्केच वाढले. शैक्षणिक सोयीत ३०० टक्के वाढ होऊनही आज ६.३ कोटी मुलांना शिक्षण मिळू शकत नाही. ३.१ कोटी जादा रोजगार मिळूनही १ कोटी लोक बेकार आहेत. ही आकडेवारी पाहिली की लोकसंख्येवर नियंत्रण ठेवणे किती निकडीचे आहे हे दिसून येईल.

### सार्वत्रिक सहकार्य हवे

देशाच्या कानाकोपऱ्यात कुटुंब नियोजन सेवा उपलब्ध करून देणे हे एक आव्हान आहे. खेडोपाडी वैद्यकीय सेवा पुरेशा प्रमाणात उपलब्ध नाहीत. ॲलोपॅथिक डॉक्टरांचे प्रमाण ४५ गावांना एक म्हणजे सुमारे २७ हजार खेडुताना एक डॉक्टर असे पडते. होमिओपाथी किंवा आयुर्वेद वैद्यांचे प्रमाण अनुक्रमे २६ व २१ खेड्यांमध्ये एक असे पडते. या सर्व डॉक्टर-वैद्यांचे पूर्ण सहकार्य या कार्यक्रमाला मिळाले पाहिजे. देशातील ९६ हजार वैद्यक व्यावसायिकांपैकी जास्तीतजास्त व्यावसायिकांना प्रशिक्षण देण्याची जबाबदारी इंडियन मेडिकल असोसिएशनने घेतली आहे. वैद्यक व्यवसायेतर संघटनांचे सहकार्य घेण्याचे प्रयत्नही करण्यात येत आहेत. रेड क्रॉस, रोटरी क्लब, लायन्स क्लब, चेंबर्स ऑफ कॉमर्स, ज्युनिअर चेंबर्स यांनी कुटुंब नियोजन कार्यक्रमाला सक्रीय पाठिंबा द्यावा म्हणून त्यांना उद्युक्त करण्यात येत आहे.

कुटुंब नियोजनविषयक सल्ला घेणे अनेकांना सोयीचे व्हावे म्हणून मध्यवर्ती ठिकाणी शिबिरे भरविण्यात येतात. या शिबिरात कुटुंब नियोजनाच्या शस्त्रक्रिया करण्यात येतात. शिबिरात येण्यासाठी जो प्रवासखर्च करावा लागतो आणि रोजगार बुडतो त्याची भरपाई म्हणून वरखर्चासाठी काही रक्कम शस्त्रक्रिया करणाऱ्यांना देण्यात येते. हा कार्यक्रम जसजसा व्यापक होत जाईल तसतशी वरखर्चाला पैसे देण्याची गरज कमी होत जाईल. • • •

(पृष्ठ ५१ वरून—**कादंबरी**)

" हे वीललेव ते अबुवकर नाय, छन्छन् पैसा वुललांव!"

" मीनी त्यांचं ओलखलां. पन अमला विचारलीनी नाय ऐसा मागूनशान ठपको नकु म्हणून बुललांव."

" आता तुमी काय करनार ?"

" पुराकार घेनार !"

" म्हंजे तुळसकरास मिलनार."

" दुसरां काय ?"

" तुळसकरांक मिलना खतरनाक है."

" पन पुडारी तोच ना !"

तेच्यापेक्षा काकालाच विचारांवा ऐसा करां."

" तरी भलां !"

" ने दंगेची भासा करू नका."

" कसी करनार ? अमची मानसां ती किती नि अमी दंगे करतांव ते काय !"

" उलटे पाखरांची मोजनारे तुमी ! अमी तुमला काय शिकवनार ? फक्त् एवरां करा—ती राजापुरची मानगर मिटवून या."

" मिटवली ! वास ?" मास्तरानी अभिवचन दिले आणि ते घराकडे वळले.

* *

# [ ६ ]

वडाखालच्या दगडी पारावर काका खमीस काढून वारा खात बसले होते. त्यांची दृष्टी चिंबाव्याच्या परिसरातल्या पोपटी मळ्यांवर खिळली होती. मळ्याच्या कडेने खाडीचा नीळा नाग सळसळत होता. खाडीच्या टोकाला गड होता. गडाच्या तटांवर दर्याच्या लाटा अहोरात्र आपटत होत्या. त्यांचा आवाज मात्र घाटीपर्यंत पोहोचत नव्हता. काकाना तो मनातल्या मनात ऐकू येत होता. कोंकणचे ते डोंगर, तो सागर, ती खाडी, ती झाडं, ते चिरे नि ती तांबडी माती——काकांचा आत्मा त्या अणुरेणूत अडकला होता. ते मनात म्हणत होते, आज पुन्हा इथे नव्या परशुरामाने जन्म घेतला पाहिजे; ह्या सागर प्रदेशाचा पुनर्जन्म घडवला पाहिजे. अरे, दृष्ट लागण्यासारखी ही हिरवीगार भूमी केव्हाची आशेला येवून उभी आहे! परशुरामाच्या नव्या अवताराला जन्म देण्याइतकी हिची कूस सुभग नाही असं कधी झालंय ?

परशु पाजळून परशुराम जर पुन्हा इथे उभा राहिला, तर तो ह्या पालवणाऱ्या विश्वात संजीवनी कशी कशी पेरत सुटेल ह्याची कल्पना करण्यात, उतरत्या सांजेचं काकाना भान उरलं नव्हतं. त्यांची समाधी महंमदमास्तर तांब्यानी मोडली.

" म्हटलां काका इथेच गावणार निवांतपणानं बोलायला. म्हणून आलांव."

" चागलं केलंत. पण पडवीवरसुद्धा भेटलो असतो रात्री. शिवाय वावीशेट भेटले असते, वाटुळीकरमामा भेटले असते."

" ते भेटतील केव्हांपन. पन मला तुम्हालाच गाठायचं होतां."

" च्यामारी !"

" कारन विषेय खाजगीतला आहे."

" बोला !"

" तुमी राजापुराला चालल्लांव ?"

" उद्या पहिल्या चांदणीला."

" इतकी घाईशी ?"

" तुम्हीच विचारता ना !"

" विचारनारच. तुमी जरा सबुरीनं घेऊन मंग जा."

" आमची गायत्री खेचून नेलीत तेव्हा तुमच्या लोकानी सबुरीनं घेतलं ?"

" बरां मुद्याचा विषय काढलांव."

" कारण तोच मुद्दा कोर्टात लढवायचाय."

" अमी झाडून तपास केलांव. भटनीची गायत्री कुनाला खबरच है नाय मोअल्ल्येमदी."

" बरोबर आहे. गाय सफऱ्यांच्या पोटात नि तुम्ही तपास करणार घाटवणावर!"

" पन गाय मारली तर लपून ऱ्हायची नाय. ती काय बकरी हाय ? धिप्पाड गुरू ते."

" तें सगळं आलं लक्षात मास्तर. आता काय नवे मुद्दे असतील ते तिकडे राजापुराला कोर्टात मांडा. नको कुणी म्हटलंय ?"

" किती वर्षां अपुन एकाच गावात ऱ्हायलो."

" वर्षं नव्हे, पिढ्या बोला, पिढ्या !"

" होय ना ? पन असला प्रसंग कधी आयला नवतां. अपुन हिंदु-मुसलेमान भावाभावा परमाणे ऱ्हायलो."

" हिटलेरसुद्धा ब्रिटिशांबरोबर भावाभावासारखा वागलावता. पण आज हाणलंनच की नाही लाथ ? कुठे गेलं त्याचं बंधुप्रेम."

" हिटलेराचा दाखला नकू !"

" नको कसा ? तोच फिट्ट लागू आहे. वळी तो कान पिळी. आमचे हिंदू आजपर्यंत असेच म्याले नि अखेरीस आता भटाब्राम्हणाना गोठ्यातल्या गाया गमावण्यापर्यंत पाळी आली ! आज गाया गेल्या, उद्या देव जातील, परवा धर्म जाईल आणि दिवस मग असेसुद्धा येतील की हे आमचं—— ते आमचं म्हणायला खुद्द आम्हीच शिल्लक असणार नाही !"

" असा कधी झालांय ?"

" सर्व काही शक्य आहे. विनाश काले विपरीत बुद्धी !"

" कसचां काय नि कसचां काय ? तुमी मानसां किती नि अमी किती ! पाचातलां एक बोट अमी."

" तो दाखला देऊ नकात. बंदुकीतली गोळी मारायला किती बोटं लागतात ? एकच ना ?"





" तुमी पन वकीलाचे वर बोलतांव ! "
" मी आलोवतो बोलायला ?"
" बरांय. आता बडवा मला खेटरान् ! मग तर झालां ?"
" हाणामारीनं प्रश्न सुटणार नाहीत. "
" टाळी द्या अगदूर ! "
" पण, म्हणून ते कोर्टात सुटणार नाहीत असं नाही ! अामचे राज्यकर्ते कोण ? ब्रिटिश. त्यांचा कित्ता आम्ही गिरवणार."
" म्हनजे राजापुरचां नक्की झाला तर ! "
" नक्की नव्हतं कधी ?"
" बरां; अमचे मुसलेमानानी गायची किंमत दिली तर ?"
" दिली तर नव्हे; कोर्ट झक्कत द्यायला लावील ! "
" पन अगदूर दिली तर ?"
" असं म्हणतां ?"
" तुमचां म्हनना काय ?"
" आपण बाबीशेटलाच विचारू या. "
" इकडे प्रकर्ण लवकर मिटलां, तर राजापुराची रखडपट्टी नकु."
" नि वर अब्रू वांचेल ती वेगळीच. "
" मग चला तर तुलसकरांचे पडवीवर. "

काका महंमदमास्तराना घेऊन तुळसकरांच्या पडवीवर दाखल झाले. पडवीवर सामसूम होती. गुळाच्या ढेपीवर माशा घोंघावत होत्या. काका पडवीवरच्या झोपाळ्यावर बसले. मास्तर अंगणातल्या बाकड्यावर टेकले. काका कां आले ते पाहायला बाबीशेट बाहेर आले.

" ह्या महंमदमास्तरानी नवाच प्रस्ताव मांडलाय. "
" ह्याना पुढारीपण कुणी दिलं ?"
" पुढारीपन कसलां बाबीशेट ? अमी स्वताच पुडारी झायले."
" म्हणजे कोर्टात तुमच्या शब्दाला तशी किंमत शून्यच."
" मास्तर म्हणताहेत की गायची किमत द्यायला मोसलेवाले तयार झाले तर कोर्ट प्रकरण मिटवाल काय ?"
" काका—काका, अहो तुम्हाला कसं समजावून सांगू ? अरे इतकं पक्कं झालेलं प्रकरण कोर्टाबाहेर मिटवणं म्हणजे बुद्धिभेद करणंच नव्हे का ?"
" कसं ?"
" कारण आपल्याला त्याना जन्माची अद्दल पक्की घडवायच्याय. सो सोनारकी, एक लोहारकी ! "
" ठीक आहे. तुम्ही म्हणता तसं करू ? महंमदमास्तर, आमचे लोक राजी नाहीत समझोत्याला."
" मंग तुमी तर अधिक काय करनार ? इतकां केलांव तेच मोप झालां.
" एरव्ही हे इतके सुद्धा करतो ना, पण आमच्या धर्माच्या रक्षणाचा प्रश्न उत्पन्न झालाय. "
" ठीक तर ! तुमचो रस्तो काय अमी रोखून धरनार ?" मास्तर निराशेने बोलले आणि निघून गेले.

बापूंच्या घाटीवर दुसऱ्या दिवशी उगवत्या सूर्याची सोनशेंदरी किरणं पडली, तेव्हा सुचतील, आठवतील त्या श्लोकांची, आर्यांची स्तोत्रांची खैरात करीत चाललेले काका पाठीवर दशम्यांची पिशवी टाकून राजापुराच्या वेशीपर्यंत पोहोचले होते.

टेंपावरून दिसणाऱ्या खोलगटातल्या राजापुराकडे ते नुसते पाहात उभे राहिले. त्यांच्या उल्हसीत मनाने त्यांना ग्वाही दिली: हाच, हाच तो सुंदर, नयनरम्य मनोहारी गार परिवर, की जो पाहून परशुरामाचं मन आरपार पालवलं असेल. हेच ते भूलोकीचं नंदनवन, की जिथे परशुरामाच्या सावलीत वाढलेल्या पिढ्यान् पिढ्यानी सुंदर कोकणी संस्कृतीचे वळणदार श्रीकार घातले असतील!

(क्रमशः)

---

(पृष्ठ ३ वरून—आमचेही (एक) मत)

## कै. भोवे यांचे पुनःस्मरण

स. न. वि. वि.

कुठल्यातरी निमित्तानं एखादा खास अंक वा पुरवणी सारेच काढतात.पण सातत्यानं दरवर्षी स्मरणपूर्वक 'क्रिकेट पुरवणी' केवळ 'दीपावली'च काढते. डिसेंबर अडुसष्टचा 'क्रिकेट पुरवणी' अंक वाचनीय अन् आकर्षक अगदी अथपासून इतीपर्यंत वाटलं बघा !

गोपाळ कृष्ण भोवे ह्यांच्या 'धन्य ते गायनी कळा' ह्या नाटकाचे परीक्षण अतिशय योग्य अन् नेमक्या तितक्याच अचूक शब्दांत केल्याने ते नाटक न बघितलेल्यांची उत्कंठा वाढविणारे आहे. नाटकातील कलाकारांच्या भूमिकेसंबंधी लिहिताना नाटकाची प्रयोगावृत्ती लिहिणाऱ्या प्रा. वसन्त कानेटकरांचा खास उल्लेख करून आपल्या परीक्षण लेखकाने प्रा. कानेटकरांना न्याय दिला आहे. परीक्षणाच्या प्रारंभी गोपाळकृष्ण भोवे ह्यांच्या विषयी लिहिलेल्या अचूक पण तितक्याच नेमक्या शब्दानं भोवे ह्यांचे ह्या जगातून जाणं पुनश्च मनाला चटका लावून जातं.

क्रिकेटविषयक मजकुरातील श्री. अरविन्द ताटके ह्यांनी कर्नल सी. के. नायडूंची माहिती, श्री. दि. श्री. कराडकर 'ऋतुराज क्रिकेट' व श्री. सुधीर कणेकर ह्यांचा 'हाउ इज दॅट' हे लेख वाचनीय वाटले. तर श्री. कृ.वि. पेठे ह्यांच्या 'क्रिकेटची बॅट'ने 'बॅट'विषयी अधिक माहिती पुरवली. शक्य झाल्यास क्रिकेटच्या इतर साधनांसंबंधी देखील माहितीवजा लेख दीपावलीत अवश्य यावेत. अन् ह्या साऱ्या साहित्याच्या जोडीला क्रिकेट संबंधीच्या विनोदांनी अधिक मजा आली.

मुखपृष्ठाचा स्वतंत्रच उल्लेख करणे आवश्यक आहे इतके ते छान आहे.

चांगल्या अंकाबद्दल पुनश्च धन्यवाद !

मालाड (पश्चिम) आपला,
मुंबई –६४ **श्रीकान्त त्रैलोक्य**








अनुक्रमणिका

NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment JANUARY



Cover Printed At Asha Printery, Bombay-4.

अनुक्रमणिका